# नवभारत

## या अंकात –




वर्ष २५
अंक दुसरा
नोव्हेंबर ७१
रु. १-२५


अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष पंचविसावे अंक दुसरा

# नवभारत

नोव्हेंबर १९७१

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

*संपादक-मंडळ*

प्रा. **वि. म. बेडेकर**—प्रा. **गोवर्धन पारीख**, प्रा. **मे. पुं. रेगे** का. संपादक



**वार्षिक रु. १२** **अंकास रु. १·२५**

हे मासिक श्री. **म. शं. साठे** यांनी **दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई** येथे छापून प्रा. **वि. म. बेडेकर** यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

**पत्रव्यवहाराचा पत्ता :**

१ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
प्राध्यापकांचे निवासस्थान
कीर्ति कॉलेज, दादर-मुंबई २८

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o दी प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. वा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २ फोन नं. ३५४८५४

## चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान

— लेखक —

प्रा. सदाशिव आठवले

किं. ३ रु.

मिळण्याचें ठिकाण —

चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई.

[ जि. सातारा ]

## महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना

लेखक— चा. अ. दाभोलकर

किं. २ रुपये

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ( सातारा )

अनुक्रमणिका






श्री. वा. रं. सुंठणकर

# मानवेतिहासातील विचारांचे कर्तृत्व

मानवजातीच्या जन्मापासून आजपर्यन्तच्या मानवी विचारांच्या इतिहासाचा आढावा घेतला म्हणजे इतर प्राण्यांच्या जगाहून मानवाचे जग किती भिन्न आहे याची स्पष्ट कल्पना येते. मानवाचे जग हे प्रामुख्याने विचारांचे जग आहे आणि हे विचार शब्द, संकेत आणि इतर प्रतीके यांच्याद्वारे व्यक्त होत असतात. प्राण्यांमध्ये त्यांच्या परस्परांतील संवादाचे जे संकेत माहीत झाले आहेत, त्यांत समजुती, संकल्पना, भावना, आशा, निराशा, हर्षामर्ष, सत्यासत्य यांचे संवाहन करणाऱ्या खऱ्या भाषेचे गुण नसतात. वाळवी, मुंग्या, मधमाश्या आणि इतर काही प्राण्यांमध्ये सामाजिक जीवन असते आणि ते गुंतागुंतीचेही पण असते. परंतु अत्यंत प्राथमिक अवस्थेतील मानवांतसुद्धा अर्थाच्या देवाणघेवाणीचा एक प्रकारचा प्रपंच चालू असतो. तसा प्रकार इतर प्राण्यांमध्ये आढळून येत नाही. बॅबून, शिंपॅन्झी, गोरिला या वरच्या दर्जाच्या प्राण्यांमध्ये त्यांच्या वयोमानाच्या वाढीचा किंवा प्रौढावस्था प्राप्त होण्याचा काळ ही एक प्रकारची सामाजिक प्रक्रिया असते. त्यांच्या जीवनाच्या या कालावधीत समाज आणि त्यांतील जीवनाची गुंतागुंत हीं त्यांच्या जीवनाचाच भाग बनतात आणि त्यांना येणाऱ्या अनुभवांनी ते शिकून तयार होतात. त्यांना मिळणारे हे शिक्षण म्हणजे त्यांचे समाजीकरण होण्याची प्रक्रिया होय. मानवी बालकाशी तुलना करता या शिक्षणाचे किंवा समाजीकरणाचे स्वरूप किती तरी मर्यादित असते.

लहान मुले जे शिकतात आणि ग्रहण करतात ते अर्थात दुसऱ्याच्या अनुकरणाने आणि उदाहरणांनी होय. मानव म्हणजे हत्यारे व अवजारे वापरणारा प्राणी असे कधी कधी वर्णन करण्यात येते. असे कांही प्राणी आहेत की जे साधनांचा वापर करू शकतात. उदा० गालापागोस या बेटावर एक गाणारा पक्षी आहे. तो झाडांना भोके पाडणाऱ्या कीटकांना हाकलून लावण्यासाठी निवडुंगाच्या काट्यांचा उपयोग करतो. येथे काट्यांचा हत्यार म्हणून उपयोग करण्याची कला त्याला अवगत असते. पण प्राणिसृष्टीत हे अगदी विरळाच असते.

इतर प्राणिसृष्टीपासून मानवाचे जे वैशिष्टय आहे त्याचे मूळ मानवाला प्राप्त झालेल्या वाणीत आहे. ही गोष्ट जाणून घेतल्यानंतर मानवेतिहासात त्या वाणीच्या द्वारे व्यक्त होणाऱ्या विचारांचे कार्य तपासून पाहाणे मोठे उद्बोधक होईल. अनेक विद्वानांनी इतिहासात झालेली परिवर्तने विचारांच्या परिवर्तनामुळेच घडून आली आहेत हे दाखवून देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या मतानुसार विचारांच्या मागे एक प्रेरक शक्ती असते आणि मानवाच्या साऱ्या कृती विचारांच्या चौकटीत बसविता येतात. दुसऱ्या पक्षी विचारवंतांच्या मते विचार, कल्पना या केवळ सामाजिक परिस्थितीचे परिणाम असतात. सामाजिक, आर्थिक, राजकीय घडामोडीत जे आधीच अस्तित्वात असते तेच विचारात आणि शब्दांत अभिव्यक्त होत असते. ही दोन्ही मते आत्यंतिक मर्यादेपर्यन्त नेणे हास्यास्पद ठरेल. पण समाजांत विचारांचे कार्य काय आहे आणि ते कसे चालते आणि समाज आपल्यापरीने विचारांवर कसा परिणाम घडवत असतो हे समजून घेण्याला ही दोन्ही मते सहायकारक ठरतात यात शंका नाही.

विचार ही इतिहासाची प्रमुख प्रेरक शक्ती आहे याची ठळक उदाहरणे इतिहासात सापडतात. युरोपच्या इतिहासात सखोल आणि सूक्ष्म विचारांची पहिली वाट ग्रीकांनी उजळली. त्यांनी जीवनाच्या विविध अंगासंबंधी चिंतन आणि मनन करून विचारपद्धति निर्माण केल्या. त्यानी पुढच्या काळातील केवळ युरोपीयच नव्हे तर जगाच्या ज्ञानविज्ञान संपदेचा भरीव पाया घातला. मानवाच्या पुढच्या इतिहासावर ग्रीकांचा गाढ प्रभाव पडला आहे. मध्ययुगाच्या अखेरीस जे महान प्रबोधन झाले त्याची प्रेरणा ग्रीक विचारात होती. आधुनिक काळातील विचारप्रणालींचा मागोवा ग्रीक काळात शोधता येतो. ग्रीकांचा काळ हा मानवेतिहासात महान युगप्रवर्तनाचा काळ होता. भारताचा इतिहास घेतला तर गौतम बुद्धाने जो विचार दिला, त्याचा प्रभाव भारतीय इतिहासात जवळजवळ १ हजार वर्षे पडला होता. बुद्धाने एक महान क्रांती घडवून आणली आणि ही क्रांती मानवाच्या भावनेत आणि विचारात होती. कांहीच्या मते तर बुद्धक्रांती ही जगातील सर्वश्रेष्ठ क्रांती आहे. या बुद्धक्रांतीतूनच अशोकाचे साम्राज्य उदयाला आले आणि त्याचा भूतदयेचा आणि मानवतेचा संदेश भारत आणि भारताबाहेरही पोहोचला. तसेच गीतेने जो विचार दिला त्याचा प्रभाव शेकडो वर्षे भारतावर पडत आला आहे. भारतातील विविध भागवत संप्रदायांची प्रेरक शक्ती गीता हीच आहे. मोडकळीस आलेल्या भारतीय समाजाला सावरून धरण्याचे कार्य भागवत धर्माने केले आहे. चीनच्या इतिहासात कॉनफ्यूशियसच्या ( ख्रिस्त पूर्व ५५१ ते ४७९ ) विचारांनी ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतका-

पासून चीनमध्ये अत्यंत कार्यक्षम असे एकसंघ साम्राज्य निर्माण करण्याला साहाय्य केले. हे साम्राज्य कित्येक शतके टिकले. अनेक चढउतार, स्वाऱ्या, उत्पात, बंडे या सर्वांच्या तडाख्यातून ते १९११ सालापर्यंत टिकून राहिले होते. विचारांच्या महत्तम कार्याचे आणखी एक उदाहरण म्हणजे महमदाचा इस्लामी धर्म होय. ७ व्या ते ८ व्या शतकात अरबी द्वीपकल्पात विखुरलेल्या आणि एकमेकात सदैव भांडणाऱ्या मागासलेल्या दरिद्री टोळयांना इस्लामने एकत्र आणून संघटित केले. त्यांच्यातून जी एक नवीन शक्ती, एक नवी सामाजिक आणि राजकीय पद्धती निर्माण झाली तिने मध्य आशियापासून तो तहत पायरिनीज पर्वतापर्यंत आणि थेट भारताच्या सीमेपर्यंत सर्व भूभाग व्यापून टाकला. महंमदाने रानटी टोळयांना जो धार्मिक विचार दिला त्याने अरबी जगाच्या इतिहासाचा क्रमच बदलून टाकला. त्याचे चिरकालिक परिणाम जगाच्या इतिहासावर झाल्याशिवाय राहिले नाहीत. युरोपच्या इतिहासात ख्रिस्ती धर्मानेही महत्तम कार्य केले आहे. रोमन साम्राज्याने प्रारंभी ख्रिस्त्यांचा अतोनात छळ केला; पण पुढे ४ थ्या शतकात रोमन साम्राज्याने ख्रिस्ती धर्म स्वीकारला आणि त्यानंतरचा युरोपचा मध्ययुगाचा सारा इतिहास ख्रिस्ती धर्माच्या वर्चस्वाखाली घडून आला. युरोपवरील या धर्माचा पगडा १५ व्या शतकानंतर रिनेसान्सच्या वैचारिक क्रांतीने हळुहळू कमी होत गेला. धर्माच्या जोखडातून रिनेसान्सने युरोपीय समाजाला मुक्त करण्याचे फार मोठे कार्य केले. बुद्धिवादी आणि वैज्ञानिक विचारांनी धर्माची पीछेहाट होत गेली. रिनेसान्सच्या विचारक्रांतीने साऱ्या युरोप खंडाला नवजीवन दिले आणि आधुनिक युगाचा पाया घातला. त्यातून ज्ञान, विज्ञान, कला, शास्त्र आणि तंत्र यांची भरभराट झाली. आधुनिक युगाचा उगम या युरोपीय रिनेसान्स मध्ये आहे.

इतिहासावर आणि समाजावर विचारांचा कसा आणि किती परिणाम होतो यासंबंधी जर्मन तत्त्ववेत्ता हेगेल आणि फ्रेंच तत्वज्ञ अगुस्त कोंत यांनी अगदी भिन्न मते मांडली आहेत. हेगेलच्या मते सर्व अस्तित्व हे चिच्छक्तीचा महान आविष्कार आहे आणि मानवी इतिहास हा या केवल चिच्छक्तीचा अपुरा आलेख आहे. या आलेखाची क्रिया अखंड चालू असते. या क्रियेत त्या चिच्छक्तीला स्वतःच्या अस्तित्वाचा साक्षात्कार होत असतो. या आलेखात युद्ध, क्रांती, अर्थकारण, राजकारण या गोष्टी क्षुल्लक असतात. अशा घडामोडीत चिच्छक्तीचा आत्माविष्कार होत असतो. या आत्माविष्कारामुळेच त्या घडामोडींना महत्त्व प्राप्त होते. हा आत्माविष्कार म्हणजेच समाजाचा पट होय. तोच विचारांचा, मतांच्या

आंदोलनांचा आविष्कार होय. हेगेलच्या म्हणण्याप्रमाणे "इतिहास म्हणजे घटनांच्या स्वरूपात स्वतःला आच्छादून घेणारे मनच होय."

हेगेलच्या मते इतिहासात चार महान संस्कृती होऊन गेल्या. त्या म्हणजे पौर्वात्य ( इजिप्त, भारत, चीन ), ग्रीक, रोमन आणि जरमॅनिक. या संस्कृती म्हणजे विश्वमनाचा आविष्कार होत असताना त्याने घेतलेली चार ऐतिहासिक रूपे होत. पहिली पौर्वात्य ही बलदंडशाही आणि पुरोहितशाही यांची संस्कृति होती. त्या संस्कृतीत व्यक्ती ही कःपदार्थ होती आणि बलदंड राजा तेवढा एकटाच स्वतंत्र होता. ग्रीक संस्कृतीत कांही लोकच तेवढे स्वतंत्र होते. त्यांनाच व्यक्तित्व होते आणि बाकीचे सारे दास होते. रोमन साम्राज्यांत मानव आणि राज्यसंस्था यांची फारकत होते आणि व्यक्ती स्वतःचाच उद्देश साधण्यामागे लागल्यामुळे भ्रष्ट होते आणि राज्य " निष्ठुर स्वार्थी सत्ता आणि लोकभ्रम यात गुरफटून जाते. " जरमॅनिक संस्कृतीत जर्मन, फरान्स, इंग्लंड आदि पश्चिम युरोपीय राष्ट्रांचा समावेश होतो. त्यांच्यामध्ये राज्य, नागरिकत्व आणि धर्म यांच्या व्यवस्थित पद्धती असल्यामुळे सर्व जनांना स्वातंत्र्य प्राप्त होते विश्वमनाला स्वतःची आणि स्वतःच्या गरजांची प्रतीती येते; आणि अखेरीस ते स्वतःमध्ये सुसंवाद साधण्यात यशस्वी होते. हेगेलच्या भराऱ्या या मनोरम वाटतात यात शंका नाही; पण त्याचे सिद्धांत गहन आणि गूढ वाटतात. कोन्तसारख्याला तर ते भ्रामक वाटले.

आपण समाजाचे एक नवे शास्त्र प्रस्थापित करीत आहो अशी कोंतची स्वतःची समजूत होती. त्याच्या मताप्रमाणे विज्ञानाचे दोन प्रकारचे नियम असतात. एक स्थितिशील आणि दुसरे गतिशील; स्थिर घटनांचे नियम आणि गतिमान घटनांचे नियम. समाजाचे नियम गतिमान असतात. कोंतच्या काळी जे विज्ञान उपलब्ध झाले होते त्याच्या प्रकाशात त्याने समाजाचा अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न केला. वास्तव आणि रसायन या शास्त्रांचे जसे नियम असतात तसेच समाजाचेही नियम असतात असे सांगून त्याने ते नियम शोधण्याचा प्रयत्न केला. सर्व सामाजिक पद्धति तीन अवस्थांतून उत्क्रांत झाल्या आहेत. देवविज्ञानात्मक ( Theological ), सत्ताविज्ञानात्मक ( Metaphysical ) आणि वैज्ञानिक ( Scientific ) या प्रत्येक अवस्थेत एकेक विचार, एकेक कल्पना प्रधान असते. देवविज्ञानात्मक अवस्थेत मानवसृष्टीचे स्पष्टीकरण निसर्गातीत शक्तींच्या द्वारे करतो. त्याची श्रद्धा जादूवर असते. रोग, मृत्यू, दुष्काळ, संकटे ही आसुरी शक्तीमुळे, दैवीकोपा-मुळे येतात अशी त्याची समजूत असते. या अवस्थेची सर्वोच्च प्रगति कर्तुमकर्तुम् आणि सर्वनियंत्या अशा एकदेवावरील श्रद्धेत होते. या पहिल्या अवस्थेत

एक विशिष्ट प्रकारची सामाजिक पद्धति अस्तित्वात येते. राज्यसत्ता ही दैवी सत्ता मानली जाते. राज्यकर्ता हा अंशतः पुरोहित आणि अंशतः दैवी अंश असतो. कुटुंबसंस्था ही सत्तावादी, पितृसत्ताक आणि पवित्र समजली जाते. तीत व्यक्तीला महत्त्व नसते. तिचे आचार-विचार-उच्चारांचे स्वातंत्र्य अतिशय मर्यादित असते.

दुसरी सत्ताविज्ञानात्मक अवस्था ही तुलनेने अल्पावधीची असून संक्रमण-कालाची असते. या अवस्थेच्या प्रमुख विचारप्रवाहात वैयक्तिक अंगाला स्थान नसते. उदा० गुंगीच्या औषधाने येणारी गुंगी त्यात असणाऱ्या असुरामुळे नव्हे तर गुंगी आणणारे तत्व असते त्यामुळे होय अशी समजूत असते. ताऱ्यांचे भ्रमण देवदूतामुळे घडून येत नाही, तर त्या ताऱ्यामध्ये जे सत्व असते त्यानुसार घडून येते. देव आणि असुर, दैवी शक्ती आणि आसुरी शक्ती यांची जागा या अवस्थेत पदार्थातील तत्वे आणि सत्वे घेतात. या अवस्थेतील समाजपद्धती पहिल्या अवस्थेपेक्षा अधिक बुद्धिप्रवण असते. तिसरी अवस्था वैज्ञानिक विचारांची आणि विज्ञाननिष्ठ सामाजिक जीवनाची असते. या अवस्थेत विज्ञान हे सार्वभौम असते आणि समाजहितासाठी मानव उपयुक्त आणि प्रत्यक्ष ज्ञान यांच्या संवर्धनासाठी सतत धडपड करीत असतो.

कोंतच्या प्रत्यक्षवादाचा फार मोठा प्रभाव १९ व्या शतकाच्या पूर्वार्धात युरोपीय विचारांवर पडला होता. इंग्लंडच्या विचाराबरही त्याचा गाढ प्रभाव होता. बेन्थॅम, मिल, हॅमिल्टन, स्पेन्सर, बेन हे व्हिक्टोरिया युगातील महान विचारवंत प्रत्यक्षवादीच होते. विसाव्या शतकाच्या आरंभी प्रत्यक्षवाद मागे पडला.

हेगेल आणि कोंत यांच्या पद्धतीत विचारांना प्राधान्य होते. या उलट प्रतिक्रिया मार्क्स आणि एंगल्स यांच्या पद्धतीत दिसून येते. त्यांना विचारांचे जग हे आभासाचे जग वाटते. फार झाले तर ते निवडक सत्यांचे जग असते असे म्हणता येईल. पण हे आभास किंवा ही निवड हीं जाणीवपूर्वक किंवा आत्मवंच-नेच्या स्वरूपाची नसतात. ती सामाजिक घटकामुळे निर्माण होत असतात. त्यांचा कर्ता सामाजिक घटक असतो. आपल्या इच्छेप्रमाणे विचार करण्याला आपण मोकळे आहोत असे आपण समजत असतो. पण मार्क्सच्या मताप्रमाणे आम्ही जो विचार करतो तो आमचे समाजातील स्थान आणि इतर सामाजिक गटाशी असणाऱ्या संबंधामुळे आम्हाला मिळणारे फायदे अगर गैरफायदे यांना अनुसरून आणि त्यांच्या संदर्भात करीत असतो. मार्क्सने सारा भर उत्पादनाची साधने व

त्यातून निर्माण होणाऱ्या आर्थिक हितसंबंधावर दिला. प्रोटेस्टंट पंथाच्या धर्मसुधारणेच्या आंदोलनात त्या पंथाच्या अनुयायांना आपला झगडा देवाप्रीत्यर्थ चालू होता असे वाटत होते. पण प्रत्यक्षात ते भांडवलदारी सामाजिक वर्गाच्या हितसंबंधासाठी झगडत होते. तो झगडा नव्या आणि जुन्या समाजपद्धतींचा होता. मार्क्सच्या मते समाजात जे झगडे चालू असतात ते सदैव विभागलेल्या आणि परस्परविरोधी अशा समाजाच्या गटात चालत असतात. हे गट आपापल्या स्वार्थाकरिता झगडत असतात. थोडक्यात विचार हे सतत समाजात चालू असणाऱ्या अनिवार्य अशा एका सामाजिक प्रक्रियेमुळे चालत असतात, विचारावर सामाजिक हितसंबंधाचा परिणाम होत असतो. आणि त्या हितसंबंधाच्या अनुरोधाने विचार निरनिराळी रूपे धारण करतात. हे हितसंबंध विशिष्ट वर्गांचे आर्थिक हितसंबंध असतात आणि विरोधी हितसंबंधांशी त्यांचा संघर्ष चालू असतो.

म्हणजे मार्क्सच्या मताप्रमाणे धार्मिक आणि तात्त्विक विचार हे विद्यमान आर्थिक आणि राजकीय व्यवस्थेचे समर्थन करतात आणि त्यांची न्याय्यता सिद्ध करण्याचा प्रयत्न करतात. मार्क्सच्या पद्धतीत सर्व विचार हे तात्त्विक पद्धतीच्या मुशीत ओतले जातात आणि त्यांच्या तत्वप्रणाली तयार होतात. मार्क्स म्हणतो त्याप्रमाणे विचारावर जे सामाजिक दाब असतात त्यांचा त्यावर परिणाम होत असतो यात संशय नाही. पण ही क्रिया सदैव चालू असते का? खुद्द मार्क्सच्या विचाराबद्दल असे म्हणता येईल का? त्याच्याच म्हणण्याप्रमाणे त्याचे विचार जर समाजाचीच निर्मिती असतील, तर मग त्यांचे मूल्य काय आणि ते कसे ठरवावयाचे? अर्थात मार्क्सपाशी याचे उत्तर आहेच. मार्क्स आणि एंगल्स यांचे प्रतिपादन असे की सर्व मानवेतिहास चार परिवर्तनातून गेला आहे. ही चार परिवर्तने म्हणजे प्राथमिक अवस्था, गुलामगिरीची अवस्था, सरंजामी अवस्था आणि शेवटची भांडवलदारी अवस्था. या शेवटच्या अवस्थेनंतर साम्यवादाची अंतिम अवस्था यावयाची आहे. या अंतिम अवस्थेत समाजात विभागणी, वर्गवारी असणार नाही; वर्गस्पर्धा किंवा वर्गसंघर्ष यांना तीत स्थान नाही. सामाजिक पद्धतीनुसार विचारांचे सांचे बनणे किंवा त्यांचे परिवर्तन होणे असे प्रकार घडणार नाहीत. समाजात कल्पना आणि वास्तवता, विचार आणि सत्यस्थिती ही परस्परांना अनुरूप असतील, त्यांचे तादात्म्य घडून येईल.

मार्क्सची ही विचारसरणी जर्मन समाजशास्त्रज्ञ मार्क्स वेबेर याला मान्य नाही. ऐतिहासिक प्रक्रियेत विचारांना महत्व असते असे वेबेरला निश्चितपणे वाटते. भांडवलशाहीच्या उदयात प्रोटेस्टंट पंथीय धर्मसुधारणेचा उगम आहे हा

मार्क्सचा सिद्धांत त्याने खोडून काढला. भांडवलदारी संस्कृती आणि धर्म ही अटळपणे भांडवलदारी आर्थिकरचनेचे परिणाम असतात या मार्क्सप्रणीत मतावर त्याने हल्ला चढविला. त्याने असे प्रतिपादन केले की, १६ व्या शतकात युरोपात जी धर्मक्रांती झाली तिने विशेषतः जर्मनीत माणसांच्या वैयक्तिक वृत्तीत आणि समाजाच्या अंतर्गत रचनेत खूपच बदल घडवून आणला. प्रोटेस्टंटांच्या काटकसरीच्या आणि कामसू नीतिशास्त्रामुळे भांडवलदारी व्यवहाराला उत्तेजन मिळाले. प्रोटेस्टंट नीतिशास्त्राच्या प्रभावाने विशिष्ट मनोवृत्तीचा एक वर्ग निर्माण झाला. त्या वर्गाने युरोपात भांडवलदारी पद्धती शक्यकोटीत आणली. त्या वर्गाची मनोवृत्ती हा भांडवलदारीच्या स्थापनेतील महत्वाचा घटक होता. या वर्गाच्या योगाने भांडवलदारी पद्धतीचा मार्ग सुकर झाला. या बाबतीत वेबेर ल्यूथरपेक्षा कॅल्विनला अधिक श्रेय देतो. कॅल्विनच्या शिकवणीने अर्वाचीन युगातील भांडवलदारी आक्रमक वृत्ती आणि अहंकार यांना चालना दिली. "यत्नशील असणे म्हणजे देवाचा गौरव करणे होय. जो उद्योगात मग्न असतो तो देवाची अधिक सेवा करतो. विषयसुखाचे सेवन म्हणजे पाप होय. आपले व्यवसाय देवाचेच कार्य म्हणून निष्ठेने करावेत." या कॅल्विनच्या उपदेशामुळे भांडवलदारी व्यवहाराला अनुकूल वातावरण निर्माण झाले. भारत आणि चीन यासारख्या प्राचीन देशांत भांडवलदारी पद्धतीचा प्रारंभ झाला नाही. याचे कारण तेथे प्रोटेस्टंट नीतिशास्त्रासारखे विचार प्रसृत झाले नाहीत. वेबेरच्या मताप्रमाणे विचार आणि समाज यांच्यातील संबंध मार्क्स आणि कोंत समजतात त्यापेक्षा अधिक गुंतागुंतीचे आणि सूक्ष्म असतात.

मार्क्सच्या आर्थिक नियतिवादाला आव्हान देणारे आणखी एक थोर विचारवंत म्हणजे मानवेंद्रनाथ रॉय होत. त्यांनी उत्पादनाच्या साधनानुसार, आर्थिक हितसंबंधानुसार विचार घडत असतात हा मार्क्सचा सिद्धांत खोडून काढला. मानवजातीच्या ज्या ऐतिहासिक, सामाजिक, राजकीय, सांस्कृतिक इत्यादि प्रक्रिया चालतात त्या सर्वामध्ये विचारांच्या गतिमत्तेला निर्णायक महत्व असते असे त्यांनी सांगितले. धर्म, नीति, कायदा, तत्वज्ञान, मूल्ये, समाजसंस्था, विचारपद्धती हीं सर्व केवळ उत्पादनाच्या साधनावर उभे रहाणारे डोलारे नव्हेत. ग्रीकापासूनच्या युरोपीय विचारांचा आणि तत्वज्ञानांचा आढावा घेतल्यानंतर ते या निष्कर्षाप्रत आले की, विचारांना स्वतंत्र अस्तित्व असते, त्यांचा विकास त्यांच्या स्वतःच्या नियमांनी आणि तर्कशास्त्राने होत असतो. नव्या विचारांचा मागोवा जुन्या विचारात घ्यावा लागतो. विचार माणसाच्या मेंदूत निर्माण होतात ही जीवशास्त्रीय प्रक्रिया असते. पण एकदा विचारघडणीची प्रक्रिया पूर्ण झाली, विचार एकदा

तयार झाले म्हणजे मग त्यांना स्वायत्त अस्तित्व प्राप्त होते; त्यांचे स्वतंत्र गतिशास्त्र असते; त्यांचा स्वतंत्र विकासक्रम सुरू होतो. विचारांच्या घडामोडी आणि सामाजिक घडामोडी या वेगवेगळ्या आणि स्वतंत्रपणे चालू असतात. विचारांचा विकासक्रम आणि सामाजिक उत्क्रांतीची भौतिक प्रक्रिया यांचा एकमेकावर प्रभाव पडत असतो. या दोन्ही प्रक्रियांचा मिळून इतिहास घडत असतो. विचारांचा तर्कशुद्ध विकास आणि सामाजिक शक्तींचे उत्थापन ही एकाच वेळी घडून येत असतात. या दोन्ही इतिहासाच्या प्रेरक शक्ती असतात. विचारांचे गतिशास्त्र वगळून इतिहासाचा विचार करता येणार नाही. विचारांच्या या गतिशास्त्राच्या आधाराने त्यानी असे दाखवून दिले की, "मध्ययुगाच्या आर्थिक परिस्थितीचा बारकाईने अभ्यास केल्यानंतर असे दिसून येते की व्यापारी वर्गाचा उदय आणि रिनेसान्स यामध्ये कार्यकारणभावाचा कोणताही संबंध नाही. रिनेसान्सचा मानवतावाद हा निखालसपणे उगवत्या भांडवलदार वर्गाची विचार-प्रणाली नव्हता."

फ्रॉयड हा वेबरचा समकालीन होता. त्याने एक नवी मानवसृष्टी खुली केली. माणसाचे मन, त्याच्या भावना, विकार, हेतू प्रवृत्ति, त्याच्या मनाची घडण इत्यादि संबंधीच्या जुन्या कल्पना त्याने मुळापासून ढवळून काढल्या. विचारांची नियंत्रक शक्ती आणि वस्तुनिष्ठ सत्य यांच्याविषयीच्या रूढ कल्पनांना त्याने धक्का दिला. जाणिवेच्या मनामागे नेणिवेचे एक मन असते, तार्किक मनाच्या मागे अतार्किक मन दडलेले असते हे त्याने दाखवून दिले. वैयक्तिक आणि सामाजिक जीवनावर विचारांचे प्रभुत्व असते या श्रद्धेला मार्क्सने हादरा दिला. तर फ्रॉयडने खुद्द विचारांच्या प्रामाण्याविषयी, विशेषतः धर्म, नीति, राजकारण यांच्या संबंधीच्या विचारांच्या प्रामाण्याविषयी शंका उपस्थित करून त्या श्रद्धेला दुसऱ्या बाजूने धक्का दिला.

मार्क्स आणि फ्रॉयड यांनी हेगेलने निर्माण केलेले सर्वव्यापी बुद्धियुक्त आत्माविष्कारी मनाचे विश्व उध्वस्त केले. फ्रॉयडचे मनोविश्लेषणशास्त्र खरे मानावयाचे झाले, तर विचार, उच्चार आणि आचार यांचे बुद्धिप्रणीत ऐक्य मानवजातीला साध्य करता येईल ही आशाच सोडून द्यावी लागेल. कारण मानवी मनाच्या अतार्किक अंगामुळे ती निष्फळ ठरेल. जगाकडे पाहाण्याचा बुद्धिवादी दृष्टिकोण प्राप्त करून घेण्याच्या दिशेने प्रगति साधावयाची असेल, तर त्यासाठी मानवजातीला फार मोठी किंमत द्यावी लागेल हे वेबरचे मतही कदाचित खरे असू शकेल. जसजसे वैज्ञानिक, बुद्धिवादी आणि तांत्रिक विचारांनी मानवी जीवन

अधिकाधिक व्यापले जाते, तसतसे श्रद्धा, काव्य, जादू, पुराणकथा यांचे क्षेत्र अधिकाधिक आकुंचित होत जाते; आणि वीर पुरुषांच्या महत्त्वाकांक्षांना मर्यादा पडत जातात. त्यातून भ्रमनिरास होत जातो. बुद्धिप्रणीत आणि बुद्धिविरोधी विचारात ताण निर्माण होतात. त्यामुळे माणसे वैफल्याकडे किंवा स्वैर बंडाच्या प्रवृत्तीकडे खेचली जातात. याचा प्रत्यय जर्मनीच्या नाझीवादात आला आहे. आधुनिक सामाजिक मानवशास्त्राने विस्ताराने असे दाखवून दिले आहे की, मानवाचे अनुभव आणि ज्ञान यांच्या योगाने जी विचारांची चौकट निर्माण होते, तिच्या आधारावर समाज उभा असतो आणि तो टिकून राहातो. विज्ञान आणि तंत्रज्ञान यांच्याद्वारे मानवाचे अनुभव, त्याचे ज्ञान, त्याची विचारसृष्टी, त्याची भावसृष्टी, यांच्यात परिवर्तन घडून येत असते आणि त्याबरोबरच समाजाच्या रचनेतही बदल घडून येत असतो.

सुमारे तीनशे वर्षांपूर्वी फान्तानेल या फ्रेंच लेखकाने असे लिहिले होते की, सगळी तत्त्वज्ञानात्मक चिंतने ही दोन गोष्टींचे परिपाक असतात. मानवाचे मन जिज्ञासू असते. पण त्याबरोबरच ते फार अदूरदर्शीही असते. हे खरे असले, तरी आम्ही आमचे विचार आणि कल्पना भाषेच्याद्वारे जतन करू शकतो, भूतकाळातील बरेचसे राखून ठेवू शकतो आणि भविष्याचे अंदाज बांधू शकतो. मार्क्स म्हणतो त्याप्रमाणे माणसाचे विचार हे जसे त्याच्या भौतिक परिस्थितीच्या प्रतिक्रिया असतात, तसेच कोंतच्या मताप्रमाणे विचार माणसाची परिस्थिती निर्माण करण्याला आणि तिला आकार देण्याला कारणीभूत होतात. या दोन्ही मतामध्ये सत्यांश आहे. एक गोष्ट मात्र निश्चित आहे. विचारांच्या इतिहासाने मानवेतिहासाचा फार मोठा भाग व्यापला आहे. पण त्याचा जितका सखोल अभ्यास व्हावयास पाहिजे तितका तो अद्याप झाला नाही.

मानवेतिहासाचा विचार प्राचीन युग, मध्ययुग आणि अर्वाचीन युग असे खंड पाडून करण्यात येतो. प्राचीन युगामध्ये ग्रीक आणि रोमन संस्कृतीच्या कालखंडांचा विचार येतो. त्यानंतर इ. स. ६०० ते १५०० पर्यंतचे मध्ययुग मानण्यात येते. या मध्ययुगातही दोन भाग पडतात इ. स. ५०० ते १००० पर्यंतचे अंधारयुग आणि त्यानंतरच्या १५ व्या शतकापर्यंतच्या कालाला खास मध्ययुग म्हणतात. रिनेसान्सच्या काळापासून पुढच्या अर्वाचीन युगात धर्मसुधारणा, भौतिक विज्ञानांचा उदय, प्रबोधन आणि औद्योगिक क्रांती असे कालक्रमानुसार भाग पडतात. शेवटचा औद्योगिक क्रांतीचा कालखंड अद्यापही चालू असून तिच्या संस्कृतीचा विस्तार सर्व जगभर झपाट्याने पसरत आहे.

ग्रीकी-रोमन काळापूर्वीच्या ज्या अतिप्राचीन संस्कृति होऊन गेल्या त्यानी ग्रीक संस्कृतीचा पाया घातला. इजिप्त, मेसापोटेमिया, बॅबीलोन आदि प्राचीन संस्कृतीनी लेखनकला, चाकांचा उपयोग, नावा बांधण्याची कला आणि कालगणना या जगाला दिलेल्या महत्वाच्या देणग्या आहेत. प्राचीन जगाच्या या संपादणीच्या पार्श्वभूमी-वर ग्रीकांना आपली महान संस्कृती उभारणे शक्य झाले. प्राचीन संस्कृती व्यवहारी संस्कृती होत्या असे म्हणता येईल. त्यांची प्रतिभा व्यावहारिक होती. त्यानी नित्योपयोगी साधने निर्माण करून त्यांच्या साहाय्याने टोलेजंग संस्कृती निर्माण केल्या. ह्या संस्कृतींचा वारसा घेऊन ग्रीकांनी पुढे दौड मारली. ग्रीकाचे महत्वाचे श्रेय म्हणजे अमूर्त, गहन असे चिंतन करून त्यातून त्यांनी तात्विक पद्धती निर्माण केल्या हे होय. बुद्धीचे स्वैर चिंतन, सूक्ष्म सूचक विचारसंपदा आणि ती अर्थवाहक भाषेत व्यक्त करण्याची कला, ध्येयांच्या आणि आदर्शांच्या सुसंगत पद्धती जाणीव-पूर्वक निर्माण करणे ही ग्रीक संस्कृतीची वैशिष्टये होती. मानवजातीने गाठलेला हा महत्वाचा टप्पा होता. बौद्धिक क्षेत्रातील ग्रीकांची झेप कौतुकास्पद होती. ग्रीकांना जीवनाच्या मूलभूत तत्वांचा शोध घेण्याचा हव्यास होता. ग्रीक प्रज्ञेचा तो विशेष होता. पुढच्या सर्वंध मानवी सुधारणेच्या आणि संस्कृतीच्या प्रगतीला ग्रीकांचे विचार आणि त्यानी निर्माण केलेल्या पद्धती पायाभूत ठरल्या आहेत.

वैचारिकदृष्टच्या युरोपातील युगांना विविध नावे देण्यात आली आहेत. कलांच्या दृष्टीने प्राथमिक, अभिजात (baroque), अद्भुतरम्य अशी नावे देण्यात येतात. तत्वज्ञानाच्या क्षेत्रांत बुद्धिवादी, पीठपंडिती आणि चिद्वादी हीं नावे रूढ झाली आहेत. स्थूल मानाने त्या त्या युगाला हीं नावे यथार्थतेने लागू पडतात; आणि त्या त्या युगाचे नाव सार्थ करणारे आणि त्या युगाला एकत्र गोवणारे विचारांचे सूत्रही सापडते. बुद्धिवाद आणि वैज्ञानिक दृष्टिकोण हीं ग्रीक संस्कृतीची वैशिष्टये होती. युरोपात इ. स. १००० ते १५०० या युगाला पीठपंडिती युग समजतात. १३ वे शतक हे पीठपंडितवादाच्या ( Scholasticism ) ऐन बहराचे युग होय. पीठपंडिती तत्वज्ञानाने ख्रिस्ती धर्माचा आधार घेऊन ऐहिक आणि पारलौकिक यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न केला. त्यांनी रचलेले तर्कशास्त्र पृथ्वीवरून स्वर्गाकडे जाण्याचे सोपान होते. स्वर्गाकडे धाव घेण्याची हाव गोथिक शिल्पकलेतही प्रत्ययास येते. गोथिक शिल्पांची शिखरे जणू आकाशाचा भेद घेत असतात. समाजाचा एकंदर साचा सरंजामी पद्धतीचा होता. भूदासापासून राजापर्यन्त ठराविक वर्गश्रेणीने समाज बांधला गेला होता. नांगर हाकणाऱ्यापासून तो राज्यशकट हाकणाऱ्यापर्यन्त लोकांची मनोवृत्ती एकाच

नमुन्याची बनली होती. १८ व्या शतकातही असेच एक सूत्र शोधून काढता येते. त्या शतकात विकसित झालेल्या बुद्धिवादाची प्रतिबिंबे स्वच्छ, सुस्पष्ट रीतीने गणित शास्त्रात उमटलेली दिसतात. तशीच ती त्या युगाच्या रचनाबद्ध रेखीव शिल्पकलेतही दृष्टोत्पत्तीस येतात. १९ व्या शतकातील विचारांचे दुवे हे फ्रेंच क्रांती आणि साम्राज्यविस्तार यांच्यातून उद्भवलेली राजनीति आणि युद्धे आणि अद्भुतरम्यवादी साहित्य आणि काव्य यांनी सांधलेले दिसतात.

पौर्वात्य जगाच्या इतिहासात वैचारिक अवस्था इतक्या स्पष्टपणे दृष्टोत्पत्तीस येत नाहीत. पौर्वात्य जग पाश्चिमात्यांचा संपर्क येईपर्यन्त मध्ययुगातच वावरत होते. इस्लामी जगाबद्दलही असेच म्हणता येईल. अरबी संस्कृतीचा उज्ज्वल काळ सोडला तर विचारांच्या दृष्टीने जगाला इस्लामची देणगी फारच थोडी आहे. अरबांनी मात्र अंधाऱ्या समजल्या जाणाऱ्या मध्ययुगात ज्ञान–विज्ञानाची ज्योत तेवत ठेवली होती. त्या ज्योतीनेच आधुनिक संस्कृतीची वाट उजळली. इस्लामचा जन्म देवविज्ञानात्मक अवस्थेत झाला. पण अरबांनी तिची पातळी उंचावून ती सत्ताविज्ञानात्मक अवस्थेतच नव्हे तर विज्ञानयुगाच्या पूर्वावस्थेपर्यन्त नेऊन पोहोचविली. भारत दीर्घकाल देवविज्ञानात्मक आणि आध्यात्मिक अवस्थेतच राहिला. येथे अनेकेश्वरवादाची परिणति सर्वेश्वरवादात झाली आणि सत्ताविज्ञानाने आध्यात्मिकतेचे रूप धारण केले. ब्रह्म, मायावाद आणि कर्मवाद यातच भारत शतकानुशतके घोटाळत राहिला. अध्यात्मवादाच्या कोंडीतून तो बाहेर पडू शकला नाही. ग्रीक संस्कृतीप्रमाणे येथेही प्रारंभी बुद्धिवादी आणि जडवादी विचारांच्या परंपरा निर्माण झाल्या होत्या. ग्रीसमध्ये जसा एपिक्युरस झाला तसाच आणि किंबहुना त्याच्याही पूर्वी येथे चार्वाक होऊन गेला. डिमॉक्रिटसच्या आधी भारतात कणादाने आपला परमाणूवाद सांगितला होता. उपनिषदे, वैशेषिक आणि सांख्य यांमध्ये जशा जडवादाच्या परंपरा शोधता येतात, तशाच बौद्ध आणि जैन या मतात बुद्धिवादाच्या परंपरा सापडतात. वैदिक तत्त्वप्रणालीविरुद्ध प्रतिक्रिया म्हणून बौद्धमत उदयाला आले आणि कित्येक शतके त्याने प्रभाव गाजविला. बौद्धमताची पिछेहाट झाल्यानंतर वेदांताची धुरा घेऊन ब्राह्मणवादाने ब्रह्म आणि माया यांची कास धरून अध्यात्मात दडी मारली. शंकर, रामानुज आदि आचार्यांची काही प्रमाणात युरोपातल्या पीठपंडिताशी तुलना करता येईल. या दोघातही तर्काला महत्त्व होते. पण पीठपंडित चर्चमताला जखडले गेले होते, तर आचार्य अध्यात्मातून बाहेर पडू शकले नाहीत. युरोपमध्ये सर्व क्षेत्रात क्रांती घडवून आणणारा जसा रिनेसान्स

झाला तसा तो भारतात आणि एकंदर पौर्वात्य जगात झाला नाही. पौर्वात्यांच्या पिछेहाटीचे मर्म यातच आहे.

इतिहासकालातील या निरनिराळ्या प्रवाहांचा संगम आधुनिक युगात होत आहे. जगाच्या भिन्नभिन्न भागातील विचारांचे आणि ज्ञानाचे प्रवाह एकत्र येऊन जगाच्या इतिहासात अगदी प्रथमच एक जगद्‌व्यापी संस्कृति आणि विज्ञान आणि तंत्रज्ञान यांच्या प्रभावाने समृद्ध झालेली विचारसंपदा उदयाला येत आहे.

मानवी विचारांच्या इतिहासाचे सिंहावलोकन केले म्हणजे त्यातही चढउतार दिसून येतात. काही युगामध्ये विचारांना बहर येतो, मानवी प्रतिभेला नवनवे उन्मेष येतात, मानवजात संपन्न होते. काही युगे त्या मानाने ओसाड वाटतात. विचारांची गति स्थगित झाल्यासारखी वाटते. एका युगामध्ये काही विशिष्ट विचारांचा प्रभाव असतो, तर दुसऱ्या युगात त्याना अगदी गौणस्थान प्राप्त होते. प्राचीन संस्कृतींच्या पुराणकथात्मक विचारणात ( mythical thinking ) खंड पडून नवा मार्ग चोखाळणारे ग्रीक हे पहिले होते. त्यानी इजिप्त आणि मेसापोटेमिया यांच्यापासून गणित, खगोल आदि शास्त्रे उचलली. पण त्यांनी बुद्धिवाद आणि अनुभववाद यांची कास धरून विचारांना एक नवेच वळण लावले. तर्क आणि चिकित्सा यांच्या साह्याने सर्व घटनांची छाननी आणि स्पष्टीकरण करण्याचा पायंडा त्यांनी पाडला. माणसांच्या अनुभवाचे पद्धतशीर निरीक्षण करून त्याच्या आधाराने विचार निर्माण करण्याची पद्धति त्यांनी सुरू केली. अनुभव आणि निरीक्षण या दोन तत्वांनी तत्वज्ञान आणि विज्ञान यांची उभारणी होते. अशी उभारणी करणे हे ग्रीकांचे महान श्रेय होते.

युरोपात विचारांच्या इतिहासात ग्रीक विद्येनंतरचा दुसरा टप्पा पीठपंडिती विद्येचा होता. पीठपंडितवादाने पुरस्कारलेली विचारधारा ग्रीकांच्या प्रमाणे मौलिक नव्हती. त्यांची पद्धति समन्वयाची होती. धर्माच्या छत्राखालीच त्यांनी बुद्धी आणि बुद्धिवाद यांची वाढ करण्याचा प्रयत्न केला. तर्कपद्धतीला अनुसरून बुद्धी आणि श्रद्धा यांची सांगड घालण्याचा प्रयत्न त्यांनी केला. सृष्टीचा नियंता असा निसर्गाचा कायदा असतो असे मानून त्यानी नियमबद्ध विश्वाच्या कल्पनेचा पुरस्कार केला. नियमबद्ध विश्वाच्या त्यांच्या कल्पनेने पुढच्या विज्ञानाची वाट मोकळी केली. पीठपंडितवाद विज्ञानाच्या विरुद्ध नव्हता.

प्रसिद्ध तत्ववेत्ता व्हाइटहेड याने १७ व्या शतकाला युरोपच्या "महान प्रतिभेचे शतक" असे म्हटले आहे. या शतकापासून आधुनिक विज्ञानयुगाचा आरंभ होतो. या युगाचा पाया १४ ते १६ व्या शतकात घडून आलेल्या विचार-

अनुक्रमणिका

क्रांतीने घातला. रिनेसान्सचा काळ हा मानवी प्रतिभेच्या नवनवोन्मेषाचा काळ होता. त्या काळाने व्यक्तिस्वातंत्र्य, मानवी सर्जनशीलता, सत्यशोधनाची जिज्ञासा यावर भर दिला. स्वैर, धाडसी, विचारमंथन हे या काळाचे वैशिष्ट्य होते. १७ व्या शतकात गॅलिलिओ, न्यूटन, देकार्त, स्पीनोत्सा, लायब्नित्स आणि लॉक या वैज्ञानिकांनी आणि तत्ववेत्त्यानी बुद्धिप्रामाण्य आणि अनुभववाद यांची पद्धतशीरपणे प्रस्थापना केली आणि आधुनिक युगाच्या विचारसंपदेचा पाया भक्कम रीतीने घातला. त्यानंतरचे १८ वे शतक हे प्रबोधनाचे शतक मानले जाते. वैज्ञानिक विचारांचा प्रसार, चिकित्सक दृष्टीची आणि त्याबरोबरच संशयवादाची वाढ, जुन्या विचारांची आणि मूल्यांची फेरतपासणी ही या शतकाची विशेष लक्षणे होती. ह्यूम आणि वोल्तेर हे या शतकाचे नमुनेदार प्रतिनिधी होते. १८ व्या शतकाची परिणति अद्‌भुतरम्यवादी विचारात आणि अमेरिकन व फ्रेंच राज्यक्रांतीत झाली.

१९ वे शतक हे "तत्वप्रणालींचे युग" आहे. हे शतक हेगेल आणि डार्विन यांचे आहे. १७ व्या आणि १८ व्या शतकात देकार्तसारख्या बुद्धिवाद्यांनी आणि लॉकसारख्या अनुभववाद्यांनी मानवी ज्ञानाचे स्पष्टीकरण करण्याचा आणि त्याला निष्कर्षरूप देण्याचा प्रयत्न केला. पण १९ व्या शतकातील तत्ववेत्त्यानी उपदेशकांची आणि द्रष्ट्यांची भूमिका पत्करली. या शतकात वास्तवशास्त्र आणि जीवशास्त्र यांच्या शोधांनी विज्ञानात फार मोठी प्रगति घडवून आणली. सर्व क्षेत्रांत मानवाच्या दृष्टीसमोर नवनवी दालने आणि क्षितिजे खुली झाली. हे शतक मोठ्या उमेदीचे आणि आशावादाचे होते. ते उदारमतवादी विचारांचे आणि लोकशाहीच्या वाढीचे जसे होते, तसेच भांडवलशाहीच्या वाढीचे आणि साम्राज्यविस्तारांचेही पण होते.

पण विसाव्या शतकाने १९ व्या शतकाच्या कल्पनांना, विचारांना, मूल्यांना आणि संस्थांना धक्का दिला. हे शतक युद्धांचे, क्रांत्यांचे, उलथापालथीचे आणि प्रचंड घडामोडीचे आहे. या शतकात विचारांचे सारे जगच ढवळून निघत आहे. हे युग जसे भंजनाचे आहे, तसेच नवनिर्मितीचेही आहे. ज्ञान, विज्ञान, तंत्रज्ञान यांच्या घोडदौडीचेही आहे. मानवी प्रतिभा खऱ्या अर्थाने अस्मानाकडे झेप घेत आहे. सगळ्याच क्षेत्रांत एक प्रकारचा प्रचंड वेग आला आहे. या वेगामध्ये भूतकाल कधी संपतो आणि भविष्याचा आरंभ कोठे होतो हे शोधून काढणे कठीण झाले आहे. आपल्या प्रतिभेची अस्मान झेप प्रत्यक्ष व्यवहारामध्ये गाठणे खुद्द मानवालाही कठीण जात आहे. प्रतिभेची धाव मानवाच्या शहाणपणाला झेपेनाशी झाली आहे. प्रतिभा आणि प्रज्ञा यांच्यात एक प्रकारची रस्सीखेच




चालू अहे. गेल्या ४०० वर्षांच्या ज्ञानविज्ञानाची परिणति विज्ञानयुगात होत आहे आणि त्याबरोबरच मानवाची अचाट कृत्ये, त्याचे अद्‌भुत पराक्रम, त्याच्या आशाआकांक्षा, आशंका आणि भीति, त्याचे स्वप्नरंजन आणि स्वप्नभंजन हीही येतात. आजचे युग विज्ञानाच्या उपयोजनाचे आहे. या उपयोजनातून अनेक प्रश्न मानवासमोर उभे रहात आहेत.

मानवेतिहासात विचाराच्या दृष्टीने चार महत्वाचे टप्पे पडतात: (१) ॲरिस्टॉटल, (२) कोपर्निकस व गॅलिलिओ (३) न्यूटन आणि (४) आयन्स्टायन हे या चार टप्प्यांचे निदर्शक आहेत. या प्रत्येक टप्प्यात मानवी विचारांना नवे वळण मिळाले. ग्रीकांच्या काळात झालेली विचारांची प्रगति मानवजातीच्या प्रारंभापासूनच्या विचारसंपदेच्या कितीतरी पटीनी अधिक होती. ग्रीकांच्या विचारांचा प्रभाव सुमारे दीड ते दोन हजार वर्षे टिकून होता. कोपर्निकस व गॅलिलिओ यांनी वैज्ञानिक संशोधनाची पद्धती सिद्ध केली. न्यूटनने पुढचा महत्त्वाचा टप्पा गाठला. न्यूटनने नवी विश्वकल्पना दिली. त्यानंतर सुमारे अडीच शतकानी आयन्स्टायनने अभूतपूर्व क्रांती केली. त्या क्रांतीने साऱ्या जुन्या कल्पना ढवळून निघाल्या आणि मानवासमोर एक विश्व उभे केले. आता मानवी विचार, ज्ञान आणि विज्ञान याना कमालीची गती प्राप्त झाली आहे. क्षणाक्षणाने मानवी ज्ञानसंपदेत भर पडत आहे. ज्ञानाच्या या घोडदौडीने युद्धोत्तर काळात कमालीचा वेग गाठला आहे. या वेगाबरोबर धावत जाणे हेही मुष्कीलीचे आहे, पण धावत जाणे हेही आवश्यक आहे. मागे रहाणे हे करंटेपणाचे ठरणार आहे.

विचारांचे कर्तृत्व हे असे आहे. त्याकडे दृष्टिक्षेप टाकला म्हणजे दिसून येते की, मानवी जीवनाच्या दैनंदिन व्यवहारावर विचारांचा परिणाम होत असतो, त्याप्रमाणेच त्या व्यवहारांचाही परिणाम विचारावर होत असतो. विचार समाज घडवीत असतो आणि समाज विचारांना घडवीत असतो. अशी ही क्रियाप्रतिक्रियांची प्रक्रिया चालू असते. समाज आणि विचार हे समांतर वाहाणारे प्रवाह आहेत. आणि ते परस्परावर क्रिया प्रतिक्रिया, आघात प्रत्याघात करीत असतात. त्या प्रवाहांच्या साहाय्याने समाजजीवनाचा गाडा चालत असतो. संस्कृतीचे, तत्वज्ञानाचे, विज्ञानाचे, कलेचे इतिहास लिहिले गेले आहेत. पण विचारांचा सुसंगत असा इतिहास अद्याप रचला गेला नाही. असा विस्तृत इतिहास ज्या वेळी लिहिला जाईल, त्यावेळी समाजजीवनावर होणाऱ्या विचारांच्या परिणामावर अधिक प्रकाश पडेल पण एवढे मात्र निश्चित आहे की, विचार आणि त्यांचे वाहन जी भाषा यांच्या साहाय्याने मानवी जीवनाचे साहस शक्य कोटीत आले आहे आणि आजपर्यन्त मानवजातीने केलेली प्रगति साध्य झाली आहे. मानवाला जे विश्वज्ञान आणि आत्मज्ञान झाले त्यामुळेच हे शक्य झाले.

मानवाच्या या प्रगतीबरोबरच त्याच्यासमोर उभ्या असलेल्या समस्याही वाढल्या आहेत. विश्वात जीवन समस्यांनी आणि आव्हानांनी भरले आहे. या समस्या आणि आव्हाने यांची जाणीव मानवाला होत आहे. नीति, धर्म, कला आदि सर्व क्षेत्रांवर आणि मूल्यांवर त्यांचा परिणाम होत आहे. तंत्रविद्येत झपाट्याने झालेली प्रगति, तीमुळे वाढलेली उत्पादनक्षमता, वाढत्या दळणवळणामुळे जगाचे होत असलेले एकत्रीकरण आणि या सर्वांतून वाढणारी गुंतागुंत यातून या समस्या उद्भवल्या आहेत आणि त्या वाढत आहेत. युद्धाचे संहारक स्वरूप आणि तदुत्पन्न सर्वनाश यांच्या भीतीने मानव आज बावरून गेला आहे. स्वातंत्र्याची वाढ झाली आहे आणि ती विविध रूपांनी होत आहे. मानवाची बंधने दिवसेंदिवस कमी होत आहेत. पण बंधमुक्त, स्वतंत्र होणारा हा मानव सुखी होईल का ?

मानवाचे सामर्थ्य वाढले आहे, तसेच जुलूम, जबरदस्ती करण्याचे त्याचे सामर्थ्यही वाढले आहे. या आपत्तीला मानव समर्थपणे तोंड देऊ शकेल का ? आज समाजजीवनासमोर असे अनेक निकडीचे प्रश्न उभे आहेत. ते समाजशास्त्रीय आहेत, जीवशास्त्रीय आहेत, नैतिक आहेत. राजकीय आणि आर्थिक आहेत, सांस्कृतिक आहेत आणि मूल्यांचेही आहेत. जुन्या संस्था अपुऱ्या ठरत आहेत. नव्याचा शोध घेण्याचे प्रयत्न चालू आहेत.

म्हणून आज जुने आणि नवे विचार तपासण्याची वेळ आली आहे. जुन्यातले चांगले घेऊन त्यात नव्याची भर घालून आम्हाला पुढचा मार्ग आक्रमावयाचा आहे. विचार कसे निर्माण होतात याविषयी आज आम्हाला फारच थोडे ज्ञान आहे. काही कालखंड विचारसंपन्न का होतात आणि इतर तसे का नसतात याचे स्पष्ट आकलन अद्याप झाले नाही. त्याचे स्पष्टीकरण करण्याचे, त्याची कारणे शोधण्याचे प्रयत्न चालू आहेत. आजचा मानव जन्माला येतानाच आजपर्यन्तचा मानवजातीचा बौद्धिक वारसा घेऊनच जन्माला येतो. या वारशाचा तो कसा उपयोग करतो, त्यात भर घालून तो कसा वाढवितो यावर मानवजातीचे भवितव्य अवलंबून आहे. हे करण्याच्या मानवाच्या पात्रतेवर, त्याच्या समर्थतेवर आम्हाला श्रद्धा ठेवली पाहिजे. या वारशाची संपन्नता, त्यातील विविधता, संमिश्रता आणि त्याचे कालानुवर्तित्व ही लक्षात घेतली पाहिजेत. मानव हा संस्कारक्षम, शिकणारा आणि अनुकरण करणारा प्राणी आहे. नवे विचार निर्माण करण्याचे, ग्रहण करण्याचे सामर्थ्य त्याच्यापाशी आहे. वन्यावस्थेपासून संस्कृतावस्थेपर्यंत त्याने वाटचाल केली आहे. नवी युगे, नव्या पद्धति, नव्या संस्था तो निर्माण करीत आला आहे. अनेक आपत्तींतून आपले "मानवत्व" तो राखत आला आहे; तर मग त्याची प्रज्ञा आताच उणी पडेल अशी शंका का घ्यावी.



प्रा. रा. वि. ओतूरकर

# अरविंद घोष जन्मशताब्दि

## राष्ट्रवाद, समाजवाद, व अध्यात्म

१५ ऑगस्ट हा भारताचा स्वातंत्र्यदिन तसाच तो बाबू अरविंद घोष याचा जन्मदिन, पुढील वर्षी म्हणजे १९७२ साली त्यांची जन्मशताब्दि येते त्यानिमित्त पांडिचेरी येथे पूर्वतयारी चालू असून अरविंदांचे समग्र लेखन एकत्रित करून ते प्रसिद्ध करण्याची योजना होत असल्याचे कळते. या जन्मशताब्दीच्या सोहळ्यात बंगाल व सारा भारत आपापल्यापरी भाग घेईलच. महाराष्ट्रानेही या प्रसंगाचे विस्मरण होऊ देऊ नये म्हणून वेळीच सुचविण्यासाठी हे लेखन करीत आहे.

एखाद्या थोर पुरुषाची जन्मशताब्दि साजरी करावयाची ती केवळ उत्सवप्रियतेचे प्रदर्शन करण्यासाठी किंवा 'आम्हीही यात मागे नाही' हे दाखविण्यासाठी किंवा केवळ कर्मकांडाचा भाग म्हणून नव्हे, हे मुद्दाम सांगितले पाहिजे. तशा रीतीने शताब्दिदिन साजरा झाला तर तत्कालीन जागृती होते व उत्सवसमाप्ती बरोबर ते सर्व मागे पडते. दोनवर्षापूर्वी आपण म. गांधी जन्मशताब्दीचे वर्ष ज्यारीतीने पाळले त्यांत नैमित्तिक भाग केवढा होता व ज्याचा नंतरही उपयोग होत रहावा असा भाग किती शिल्लक राहिला या संबंधीचा झाडा घेऊन पहाणे उद्बोधक होईल. सामाजिक जीवनाच्या मागे काही प्रेरणा असतात. वर्तमान समाजजीवनात राष्ट्रनिष्ठा व समाजवाद या महत्वाच्या प्रेरणा दिसून येतात. आणखीही काही प्रेरणा आहेतच. या सर्व प्रेरणा इष्ट अशा असूनही आजकालच्या समाजजीवनात असलेले दोष आपणास उघड उघड दिसत आहेत. 'असे का होते' हा एक प्रश्न विचारवन्तास बेचैन करीत असेल यात शंका नाही. थोर पुरुषांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने त्या विभूतीच्या जीवनप्रकाशात आपल्या निष्ठा किंवा प्रेरणा तपासून घेण्याची एक संधी असते. जन्मशताब्दि हे निमित्त व त्याप्रेरणांचे परीक्षण हा हेतु असे येथे थोडक्यात सुचवावेसे वाटते.

अरविन्दांच्या जीवनातील ठळक घटना आजकालच्या पिढीत फारच थोड्यास माहीत असतील. त्यांचे वडील कृष्णघन घोष हे युरोपियन संस्कृतीचे

अनुक्रमणिका

अभिमानी. त्याना अरविंदास वयाच्या सातव्या वर्षी दार्जिलिंग येथील एका युरोपियन शाळेत घातले व आणखी दोन वर्षांनी त्यांना इंग्लंडात नेले. इ. स. १८८१ ते १८९३ पर्यंत अरविंद इंग्लंडात होते तेथील दीर्घकाल जीवनामुळे त्यांना आपली मातृभाषा बंगालीही नीट बोलता येत नसे ! १८८९ त ते केंब्रिज येथील किंग्ज कॉलेजात गेले व लवकरच आय्. सी. एस. परीक्षेस बसले. लेखन-परीक्षेत पास झाले पण घोड्यावर बसण्याची एक चाचणी परीक्षा आवश्यक असे, तीत ते नापास झाले म्हणून भारतात एक उच्च सरकारी नोकर म्हणून येण्याचा त्यांचा योग नव्हता ! त्याच आय्. सी. एस्. परीक्षेत मि. बीच क्रॉफ्ट हे गृहस्थ त्यांच्या बरोबर परीक्षेस बसून पास झाले व योगायोग असा की पुढे अरविंद ज्या माणिकतोळा बाँब केसमध्ये इ. स. १९०८ साली आरोपी म्हणून पकडले गेले त्या खटल्याची चौकशी मि. बीच क्रॉफ्ट यांचे पुढेच झाली !

इ. स. १८९३ च्या आगेमागे विलायतेत अरविन्दांची आणि बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड यांची गाठ पडली. अरविंदाची हुषारी पाहून त्यांनी त्यांना आपल्या खाजगी खात्यात कारभारी म्हणून नेमून घेतले व इ. स. १८९३ त ते बडोद्यास आले. पण महाराजांच्या खाजगी कारभारापेक्षा शिक्षणाचे कार्य त्यांना अधिक आवडल्याने ते बडोद्यास इंग्रजीचे प्राध्यापक व कॉलेजचे व्हाइस प्रिन्सिपॉल झाले. तेव्हापासून ते इ. स. १९०६ पर्यंत म्हणजे पुढील तेरा वर्षे बडोद्यास होते. त्यांचा पगार दरमहा रु. ७५० होता.

बडोद्यास असतानाच त्यांनी स्वतःसाठी मुद्दाम शिक्षक नेमून घेऊन बंगाली भाषेचे अध्ययन केले. या तेरा वर्षांच्या काळांत अरविंदांचे अंतर्मन निराळ्याच दिशेने विचार करी. त्यांना अध्यात्मिक साधनेचे वेड लागले. बडोद्यास बॅ. केशवराव देशपांडे म्हणून एक क्रांतिनिष्ठ गृहस्थ असत. विलायतेत असल्यापासून त्यांची व अरविंदाची ओळख होतीच. बॅ. देशपांडे यांनी ग्वालेर येथे अध्यात्ममार्गाची माहिती असणारे लेले स्वामी म्हणून असत त्यांना बडोद्यास बोलावून घेतले व त्यांची आणि अरविंदाची गाठ घालून दिली. याच काळांत नर्मदाकिनारी चांदोद येथे ब्रह्मानंद म्हणून स्वामी असत. देवधर नावांचे बडोद्यास असलेले इंजिनियर हे त्यांचे शिष्य. देवधरांच्या मध्यस्थीने अरविंदांचा व ब्रह्मानंदांचा परिचय झाला, आणि अध्यात्मसाधनेच्या मार्गात त्यांची बरीच प्रगति झाली. इकडे ही आध्यात्मिक प्रगति चालू असता अरविंद हे मुंबईच्या इंदुप्रकाशात लेख लिहू लागले. त्यांतील काही लेख इतके कडक असत की त्यावेळी इंदुप्रकाशचे मार्गदर्शन करणारे न्यायमूर्ती रानडे यांनी त्यांच्या या लेखांच्या प्रकाशनास प्रतिबंध केला.

इ. स. १९०६ साली ते बडोदे सोडून बंगालला आले व कलकत्त्यास नॅशनल कॉलेजच्या मुख्याध्यापकाची जागा अवघ्या १५० रु. वर पत्करली. यावेळी ते वंदेमातरम् मध्ये लेखन करीत. बंगालीत युगांतर पत्र चालू असे त्यात काही प्रक्षोभक लेख आले. त्याचे इंग्रजी भाषांतर वंदेमातरम् मध्ये आले, या लेखाबाबत झालेल्या चौकशीत अरविंद हे निर्दोषी ठरले. पुढे मिदनापूर येथे बंगालची प्रांतिक परिषद भरली व इ. स. १९०७ साली राष्ट्रीय सभेचे अधिवेशन झाले. इ. स. १९०४ पासूनच ते राष्ट्रीय सभेस हजर राहात असत. सुरत कॉंग्रेसच्या वेळी अरविंद हे संपूर्णपणे टिळकांच्या राष्ट्रीय पक्षाचे होते. टिळकांवर त्यांची अतिशय निष्ठा होती. बंकिमचंद्र, टिळक व दयानंद या त्रयींना सुप्त भारत जागृत करण्याचे श्रेय आहे असे अरविन्द एका व्याख्यानात म्हणाले होते.

इ. स. १९०८ च्या एप्रिल महिन्यात मुझफ्फरपूरचे न्यायाधीश मि. किंग्जफर्ड यांनी एका अल्पवयी तरुणास वंदेमातरम् असे ओरडल्याबद्दल खटल्याचे प्रसंगी भरकोर्टात चाबकाने सडकण्याची शिक्षा दिली. यामुळे बंगाल्यात प्रक्षुब्ध वातावरण उत्पन्न होऊन दोन बंगाली तरुणांनी बॉंबच्या साह्याने किंग्जफर्डचा खून करण्याचा प्रयत्न केला तो अयशस्वी होऊन किंग्जफर्ड ऐवजी चुकून केनेडी पतिपत्नींचा खून झाला. याची चौकशी होऊन प्रसिद्ध माणिकतोळा बॉंब केस सुरू झाली त्यात अरविंद हे संशयावरून पकडले गेले. हा खटला आरोपी तर्फे चालविण्याचे काम प्रसिद्ध देशभक्त बाबू चित्तरंजनदास यांचेकडे होते; या खटल्यात बॅ. दास यांनी केलेले बचावाचे भाषण गाजलेले आहे. ते शेवटी म्हणाले "माझे हे निवेदन ऐकून ठेवा. या आरोपाविषयीचे वादविवाद केव्हातरी शांत होतील. हा आरोपीसुद्धा केव्हातरी अंत होऊन अदृश्य होऊन जाईल, पण त्यानंतरही या महापुरुषाकडे सारा समाज देशभक्तीचा शाहीर, राष्ट्रीयतेचा क्रांतिदर्शी मंत्रद्रष्टा आणि अखिल मानवतेवर प्रेम करणारा म्हणूनच पाहील. याच्या महाप्रयाणानंतरही याच्या अमृतवाणीचा ध्वनिप्रतिध्वनि उमटत राहील आणि तोही केवळ भारतातच नव्हे तर सातासमुद्रापलीकडे साऱ्याभूमंडलावरही." या खटल्याचा निकाल लागून अरविन्द निर्दोषी म्हणून सुटले. १९०८ च्या मे महिन्यात ते पकडले गेले व १९०९ च्या एप्रिलात सुटले म्हणजे उणेपुरे एक वर्ष त्यांनी कारावासात काढले. खटल्याचे काम चालू असता अरविन्दानी कोर्टात एक अक्षरही उच्चारले नाही. कारावासात त्यांची अखंड साधना चालू होती. तेथे त्यांना परमेश्वराचे दर्शन घडले आणि अरविन्द संपूर्ण बदलले. राजकारणी म्हणून कारावासात गेलेले अरविन्द अध्यात्मवादी बनून बाहेर पडले. त्यांनी तुरुंगात जाण्यापूर्वी सुरू केलेले कर्मयोगी पत्र त्यांच्या गैरहजेरीत सिस्टर निवेदिता यांनी चालू ठेविले. तुरुंगातून

अनुक्रमणिका

आल्यावरही काही दिवस ते त्यात लिहीत, पण त्यांनी अखेरनिश्चय केला. इ. स. १९१० च्या फेब्रुवारीत ते एकदम चंद्रनगरला गेले व तेथून एप्रिलात पाँडिचेरीला गेले तेथेच त्यांचा उर्वरित चाळीस वर्षाचा काळ साधनेत गेला. ५ डिसेंबर १९५० रोजी त्यांचे महानिर्वाण झाले.

पांडिचेरी निवासाच्या या दीर्घकालात त्यांना परत भारतात येण्या-विषयी अनेकवेळा बहुमानपुरस्सर निमंत्रणे गेली. लो. टिळकांनी बॅ. बाप्टिस्टा यांना त्यांजकडे पाठवून परत बोलावले, म. गांधींनी त्यांना परत येण्याची विनंति केली पण त्यांनी सर्वांस सविनय नकार दिला. खुद्द इंग्रजसरकारने अरविन्द पाँडेचरीस काय करतात हे पहाण्यासाठी तेथे आपला गुप्तचर सेवक-वेषाने तेथे पाठविला पण अरविंदाची दिनचर्या व वागणूक यांचा त्याच्यावर एवढा प्रभाव पडला की त्याने आपण होऊन गुप्तचर म्हणून राहिल्याचे कबूल करून निघून गेला ! पांडिचरीस त्यांना जे अनेक भारतीय व परदेशस्थ अनुयायी मिळाले, त्यात रिचर्ड पॉल व मिरा पॉल हे प्रमुख होत. पैकी मिरा पॉल यांना आश्रमात पुढे 'माताजी'चे प्रमुखस्थान प्राप्त होऊन नंतरच्या काळात अरविन्दांचे बाह्य जगाशी व्यवहार त्यांच्यामार्फत होत. अरविन्द कोणास भेटत नसत. वर्षातून काही वेळा दर्शन देत व एकांतवासात कालक्रमणा करीत. पांडेचरीस असता त्यानी 'आर्य' हे मासिक चालविले. त्यांत त्यांचे अनेक तत्वज्ञानपर लेख प्रसिद्ध झाले आहेत. याखेरीज 'लाइफ डिव्हाइन' 'सावित्री' हे महाकाव्य 'रेनेसान्स इन् इंडिया' या सारखी यांची अनेक पुस्तके आहेत.

१५ ऑगस्ट १९४७ हा भारताचा स्वातंत्र्यदिन तो त्यांचा ७७ वा वाढदिवस होता त्यादिवशी अरविन्दांनी जे वक्तव्य केले त्यात त्यांनी आपली चार स्वप्ने नमूद केली आहेत: 'पहिले स्वप्न म्हणजे ती क्रांतिचळवळ, की जिच्याद्वारा भारताचे स्वातंत्र्य आणि अखंडत्व साध्य व्हावे ..... दुसरे कल्पनाचित्र म्हणजे आशियाई लोकांची दास्यमुक्तता व्हावी, ..... आणखी एक स्वप्न भारताचे अध्यात्मिक ज्ञान साऱ्या जगाला व्हावे.... माझे अंतिम स्वप्न मानवी उत्क्रांतीची ती अवस्था की जीत मानव हा आदर्श व्यक्तिजीवन व निर्दोष स्वयंपूर्ण समाजाचे चित्र पाहू शकेल." अरविन्दाच्या या उद्गारांचा विचार केला म्हणजे त्यांना इ. स. १९४७ त भारतास मिळालेले स्वातंत्र्य ही त्यांच्या ध्येयाकडे जाणारी फक्त एक पायरी असे वाटत होते हे लक्षात येईल. अरविन्दांचे चरित्र बारकाईने वाचणारास त्यांच्या मनावर दोन गोष्टींचा विशेष परिणाम झालेला दिसून येतो. ते विलायतेस असताना त्यांना मॅझिनीच्या राष्ट्रवादाची जवळून

ओळख झाली. शिवाय त्यांच्या इंग्लंडमधील निवासाच्या काळात आयर्लंडमधील पार्नेलसारखे पुढारी होमरूल करिता कशारीतीने चळवळ करीत हे त्यांनी पाहिले. पुढे हिंदुस्थानात आल्यावर त्यांचा किंवा कदाचित तत्पूर्वीही रामकृष्ण परमहंस व विवेकानंद यांच्या संन्यस्त जीवनाशी त्यांचा परिचय झाला. थोडक्यात सांगावयाचे तर मॅझिनीचा राष्ट्रवाद व रामकृष्णांचे अध्यात्म यांचा परिपाक ज्यांच्या मतावर झाला ते अरविन्द होते. रामकृष्णांच्या शिकवणुकीनुसार विवेकानंदानी 'मठ व मिशन' या दोहोंच्या द्वारे भारतात फार मोठ्या कार्याचा पाया घातला. मठ हे तपश्चर्येकरता किंवा चिंतनाकरिता व मिशन हे समाजसेवे-साठी. रामकृष्ण मिशनच्या अनेक शाखा भारतभर आजही ख्रिस्ती मिशनऱ्यांना तोंड देत आसाम पूर्वविभागातील डोंगराळ प्रदेशात कार्य करीत आहेत. अरविन्दांच्या साधनेत चिंतनाचे जेवढे स्थान आहे तेवढे 'मिशन'ला म्हणजे समाजसेवेच्या शाखांना आहे असे दिसत नाही. चिकित्सक वृत्तीने पहाणारास ही एक त्यांच्या कार्यातील उणीवच म्हणावी लागेल. पण अरविंदाचा राष्ट्रवाद हा अध्यात्मावर अधिष्ठित होता हे मात्र निर्विवाद आहे. बंगालमध्ये अध्यात्मिक राष्ट्रवादांची जशी उभारणी झाली तशी महाराष्ट्रात झाली की नाही हे पहाणे जरूर आहे. सुप्रसिद्ध इतिहासकार श्री. रमेश मुजुमदार विवेका-नंदांच्या कार्याचे समालोचन करताना म्हणतात 'He thus gave a spiritual basis to Indian nationalism.' ( भारतीय विद्याभवन प्रकाशित इतिहास खंड १० वा, भाग २ रा पृ. ४९५ ). विवेकानन्दांनी राष्ट्रवाद हा धर्म आहे असे प्रतिपादिले; तर अरविन्दांनी राष्ट्रास आपली माता म्हणून मानले. 'वंदे मातरम्' हा भारतांतील परवलीचा शब्द प्रथम बंकिमचंद्रांनी आनंदमठ या कादंबरीत उच्चारला, तो अरविन्दाच्या मनांत ठसला व ते एके प्रसंगी म्हणाले 'एखादा धटिंगण माझ्या आईची विटंबना करू लागला तर अशा-वेळी किती प्रतिकार करावयाचा, त्यासाठी किती त्याग करावयाचा याचा नफ्या-तोट्याच्या भाषेत विचार करून कसे चालेल ?' ही त्यांची विचारसरणी असल्याने त्यांना तत्कालीन नेमस्त किंवा मवाळ पक्ष यांचे विचार सर्वस्वी नापसंत होते. महाराष्ट्रांत अध्यात्मवाद व राष्ट्रवाद यांचा तसा मिलाफ दिसत नाही. लो. टिळक अध्यात्मवादी होते पण ते कधी समाधीत किंवा तपश्चर्येत गुंतलेले दिसत नाहीत. अण्णासाहेब पटवर्धनांच्या चरित्रांत अध्यात्म व राजकारण एकत्र आलेले दिसते पण ते अगदी थोडेच. महाराष्ट्रांतील बहुतेक आधुनिक अध्यात्मवादी वै. सोनोपंत दांडेकरसुद्धा राजकारणाच्या भानगडीत पडले नाहीत व राजकारणी कार्यकर्त्यांनी तपश्चर्येवर किंवा साधनेवर भर दिला असे वाटत नाही. स्वातंत्र्योत्तर

कालात संयुक्त महाराष्ट्राच्या राजकारणात अच्युतराव पटवर्धन चमकले; परंतु लवकरच त्यांच्या मनाने मुरड खाऊन त्यांनी काही वर्षे एकांतवासाची दीक्षा घेतली. त्या कालात ते काय करीत होते हे माहीत नाही. पण त्यांच्या या वर्तनात अरविन्दांच्या विचारसरणीची छटा दिसून येते, हे मात्र खरे. महाराष्ट्रातील दुसरे एक राजकीय विचाराचे चिन्तक कै. शंकरराव जावडेकर आपल्या आयुष्याच्या अखेरी अखेरीस समाजवादावर लेखन करीत असता त्यांचे लेखन काहीसे अध्यात्मपर वळण घेऊ लागले व " समाजवादी क्रांतीला सत्याग्रहाची दीक्षा दिली पाहिजे ' असे त्यांनी प्रतिपादन केले. ( ' समाजवाद व सर्वोदय ' पृ. ७५–८४ ) त्यांचे हे विचार त्यांच्या पूर्वी पन्नास वर्षे विवेकानंदांनी काढलेल्या उद्गाराशी बरोबर जमतात. विवेकानंदांनी म्हटले आहे की केवळ वेदान्तच समाजसत्तावादाचा बुद्धिसंगत तात्विक पाया होण्यास लायक आहे...... आर्थिक समतेविषयीच्या आणि समान अधिकाराविषयीच्या मतांना एक अध्यात्मिक पाया असणे सुसंगत होईल. " ( ' रामकृष्णसंघ ' पृ. ५६ ). सारांश राष्ट्रवादाचे महत्त्व इहवादाच्या तत्वावर सांगत असता त्याला विवेकानंद किंवा अरविंद यांच्या विचाराप्रमाणे धर्माचे अधिष्ठान शोधणे आवश्यक आहे आणि समाजवाद हा आर्थिक विषमता किंवा विपन्नता नाहीशी करण्यासाठी आवश्यक आहे हे सांगत असता त्यास अध्यात्मिक अधिष्ठान असणे आवश्यक आहे, त्यासाठी रामकृष्णप्रणीत मठ व मिशन मठ हे चिंतन व आत्मशुद्धीसाठी आणि मिशन मानवतेच्या सेवेसाठी अवश्य आहे. मठ ही ' Theory ' व मिशन हे त्याचे जणू काय Practical. अशारीतीने आधुनिक समाजवादी व राष्ट्रवादी विचारास काही नवी दिशा सापडते का याचा शोध घेण्यासाठी अरविंदाची जन्मशताब्दि साजरी व्हावी व त्या निमित्ताने बंगालमधील अध्यात्मिक क्रांतिवादाचा अधिक अभ्यास व्हावा असे प्रस्तुत लेखकास वाटते.



प्रा. रंगनाथ कौलगुड

# हे जग कधीतरी मोडीत काढले जाणार !

## ( This world will go to mud ! )

असे म्हटले जाते की, या शतकात मानवाने जी प्रगति केली तितकी प्रगति गेल्या ५००० हजार वर्षांच्या एकूण मानवी इतिहासात झाली नाही. या प्रचंड प्रगतीचे टप्पे मागे टाकीत असताना तुम्हाला कुणी सांगितले की, "अहो. ही प्रगति नव्हे, अधोगति आहे" तर तुम्हास आश्चर्याचा धक्का बसल्याशिवाय राहिल का ? वर केलेले विधान तुच्छतावादी नसून, त्याला शास्त्रीय बैठक आहे, हेच या लेखाद्वारे स्पष्ट करायचे आहे.

उष्णता व यांत्रिकशक्ती एकमेकात रूपांतर करण्यासंबंधीच्या भौतिक घटनांचा ऊहापोह उष्णता-चलन शास्त्रात ( Thermodynamics ) केला जातो. सुरवातीला या शास्त्राची व्याप्ति मर्यादित होती, पण नंतर ती इतकी वाढली की तिच्या कक्षेबाहेर असलेला एकही विषय सांपडणार नाही. भौतिक शास्त्राखेरीज रसायन, जीव व मानस शास्त्रात उष्णता-चलन शास्त्र राबवले जाते. इतकेच नव्हे तर साहित्य, तत्वज्ञान व इतिहास या क्षेत्रात देखील उष्णता-चलन शास्त्राचे निष्कर्ष सर्रास वापरण्यात यत आहेत.

या शास्त्राच्या पहिल्या नियमात " रूपांतर क्रियेत शक्तीचा जमाखर्च बरोबर असतो " असे सांगितले आहे. एका प्रकारची शक्ती खर्ची पडली तर तेवढ्याच तोलाची दुसरी शक्ती जमा होते.

दुसऱ्या नियमाचा संबंध उष्णतेच्या प्रवाहाच्या स्वाभाविक दिशेशी आहे. ज्याप्रमाणे पाणी उंचीवरून खाली पडते, त्याप्रमाणे उष्णता जास्त तपमानापासून कमी तपमानाकडे वाहते. कोणतेही इंजिन याच तत्वाचा फायदा घेऊन उष्णतेपासून यांत्रिक शक्ती निर्माण करते. उष्णता उलट दिशेने म्हणजे कमी तपमानापासून जास्त तपमानाकडे न्यायची असेल तर त्यासाठी बाहेरून शक्ती पुरवावी लागते. म्हणूनच शीत-कपाटाला ( Refrigerator ) वीज-प्रवाह जोडावा लागतो.

वरील विवेचनावरून उष्णता व तपमान यामध्ये निकट संबंध आहे हे स्पष्ट दिसते. हा संबंध लक्षात घेऊन शास्त्रज्ञानी Entropy म्हणजेच उष्णतेचे जडत्व किंवा जडोष्णता ही कल्पना मांडली. ज्यावेळी वस्तू उष्णता बाहेर टाकते किंवा शोषून घेते त्यावेळी त्या वस्तूच्या जडोष्णतेत बदल होतो. त्याचे सूत्र असे –

$$\text{जडोष्णता बदल} = \frac{\text{शोषलेली (बाहेर टाकलेली) उष्णता}}{\text{तपमान}}$$

वरवर साध्या दिसणाऱ्या या कल्पनेने पुढे विश्वरूप धारण केलेले आहे.

उष्णता-चलन शास्त्रात 'Reversible process' 'विपर्यास क्रिया' ही कल्पना फार उपयुक्त ठरली आहे. एखादी क्रिया एका दिशेने होताना जे भौतिक परिणाम होतात, त्याच्या विरुद्ध व त्याच तोलाचे परिणाम, क्रिया उलट दिशेने चालताना झाले, तर त्या क्रियेस विपर्यास क्रिया असे म्हणायचे, उलट दिशेने क्रिया घडताना वर सांगितलेली अट तंतोतंत पाळली गेली नाही तर त्या क्रियेस अ-विपर्यास हे नाव. न्यूटनचे गतिविषयक नियम पहिल्या प्रकारात मोडतात.

प्रयोग-शाळेत मुद्दाम तयार केलेल्या परिसरात जवळ जवळ विपर्यास म्हणता येईल अशी क्रिया घडवून आणता येते. शंभर टक्के विपर्यास क्रिया शक्यतेच्या पलिकडे आहे. म्हणजेच, सर्व नैसर्गिक क्रिया मूलभूतपणे अ–विपर्यास असतात. उदाहरणार्थ, अत्तराची बाटली चुकून उघडी पडली तर आतील अत्तराचे बाष्प होऊन जाते. ते बाष्प गोळा करून पुन्हा बाटलीत भरणे शक्य नाही. फुटलेले अंडे पुन्हा पहिल्यासारखे करणे आवाक्याबाहेर आहे. हाच अनुभव इतर सर्व नैसर्गिक घटनांत येतो.

या नैसर्गिक प्रवृत्तीचा जडोष्णतेशी संबंध आहे. शक्तीचा वस्तूशी संबंध आल्यास तिचे दुसऱ्या शक्तीत रूपांतर होते. या क्रियेची एकामागून एक अशी आवृत्ती होते व एक रूपांतर-मालिका तयार होते. या मालिकेच्या सुरवातीस कोणतीही शक्ती असली तरी शेवटी मात्र उष्णताच असते. सारांश, सर्व शक्तींचे अखेरीस उष्णतेमध्ये रूपांतर होते.

उष्णतेचा संबंध वस्तूतील अणूंच्या अनियमित चलनाशी असतो. उलट इतर शक्तीमध्ये कणांचे चलनवलन कमी जास्त प्रमाणात नियमित असते. याचा अर्थ असा की, शक्ती रूपांतर क्रियेची दिशा 'नियमित चलना' पासून

'अनियमित चलना' कडे असते. म्हणजेच निसर्ग हा नेहमी व्यवस्थेतून ( Order ) अव्यवस्थेकडे ( Disorder ) जातो. जडोष्णता ही जगातील अव्यवस्थिततेचे माप मानण्यास हरकत नाही. ज्या प्रमाणात अव्यवस्थितता वाढत जाते त्या प्रमाणात जडोष्णता वाढत जाते. जगातील जडोष्णता नेहमी वाढते, हाच जडोष्णतेचा सार्वत्रिक नियम.

उष्णतेचे यांत्रिक शक्तीत रूपांतर करणाऱ्या यंत्रास इंजिन म्हणतात. त्याची रचना, कार्य व इंधन कोणतेही असले तरी इंजिनाची कार्यक्षमता उष्णता-चलनशास्त्राच्या दुसऱ्या नियमानुसार असते. प्रत्यक्षात ती सुमारे ४० टक्कयाच्या आतच असते. याचा अर्थ असा की ६० टक्के उष्णता निरुपयोगी ठरते. यापेक्षा अधिक कार्यक्षम इंजिन आताच नव्हे तर पुढे कधीही तयार करता येणार नाही. शिवाय ४० टक्के 'उपयोगी' उष्णतेपासून यांत्रिक शक्ती मिळवायची असेल तर त्याला तपमान फरक हा हवाच. त्याशिवाय इंजिन चालत नाही. हा तपमान फरक कायम न राहता हळूहळू कमी होतो. जसे सतत पडणाऱ्या धवधव्याची उंची कालांतराने कमी कमी होत जाते तसे. तपमान फरक कमी होत गेला म्हणजे उपयोगी उष्णता कमी होत जाते व 'निरुपयोगी' उष्णता जास्त होत जाते. फरक शून्य बिंदूला गेला तर सर्वच्या सर्व उष्णता अचेतन म्हणजे निरुपयोगी होईल. या अखेरच्या अवस्थेला उष्णता–मृत्यू ( Heat–death ) म्हणतात. जगाची यंत्रणा झिजत झिजत मोडकळीस येऊन शेवटी कायमची बंद पडते. अशा जगाचा मोडीत काढल्याशिवाय दुसरा उपयोग नाही.

हेच जडोष्णतेच्या भाषेत सांगता येईल. निरुपयोगी उष्णता वाढते तशी जडोष्णता वाढते. उष्णता–मृत्यू अवस्थेत जडोष्णता परमावधीला पोचलेली असते. चैतन्याचा कुठे मागमूसही उरत नाही व सर्वत्र जडोष्णतेचा महासागर ( Ocean of entropy ) पसरल्याचा भास होतो. या अवस्थेला प्रलय म्हणणे सयुक्तिक होईल.

### जडोष्णता व जीवशास्त्रे ( Life–Sciences )

जीव, मग तो प्राणी असो किंवा वनस्पती असो, हा सुव्यवस्थेचे प्रतीकच आहे. त्यात Organisation संघटन दिसते. तेव्हा जीव जडोष्णता नियमाला अपवाद आहे का ? इथे वैयक्तिक व्यवस्था दृष्टीस पडते म्हणजेच जडोष्णता स्थिर असल्याचा भास होतो; पण हे खरे नाही. कारण सार्वत्रिक विचार केला तर झिजण्याची क्रिया अव्याहतपणे चाललेलीच असते व मृत्यू हा अटळ असतो. जसे

वस्तू थर्मास–बाटलीत ठेवली तर त्या वस्तूपुरती जडोष्णता स्थिर रहाते. पण ही तात्पुरती स्थिती आहे, कारण बाटली काही मर्यादित वेळेपर्यंतच कार्यक्षम असते. सारांश, जीवक्षेत्रात एकूण जडोष्णता नेहमी वाढतच असते.

## जडोष्णता व इतिहास

मानवी इतिहासात अनेक संस्कृतींचा उगम, वाढ व नाश दृष्टीस पडतात. संस्कृतीचे घटक वेगवेगळे असतात, त्यावेळी त्यांना वैशिष्टच असते. त्यामुळे संघटन, सुव्यवस्था असते. ज्यावेळी संस्कृतीची वाढ होते, त्यावेळी हे घटक जवळ येतात, त्यांचे मिश्रण किंवा संयोग होतो व त्यामुळे वेगळेपणा नष्ट होतो व एकरूपता ( Homogeneity ) वाढते. याचाच अर्थ अव्यवस्थितता वाढते, ओघाने जडोष्णता वाढते. म्हणजेच सांस्कृतिक प्रगतीत संस्कृतीच्या अधोगतीची बीजे पेरलेली असतात. प्रगति करण्याच्या प्रयत्नात माणूस स्वतःच्या नाशाची तयारी करीत असतो. माणसाविरुद्ध केलेल्या कटाचा सूत्रधार माणूसच असतो. इतिहास वेळोवेळी हाच पाठ देत आला आहे. संस्कृतीच्या जोपासनेची गुरुकिल्ली म्हणजे 'शक्तीचा कल्पक वापर व नव्या शक्तींचा शोध.' पण शक्तीचे भवितव्य काय आहे हे जडोष्णतानियमाने केव्हाच सांगून टाकले आहे. "नवीन शक्तींचा शोध हा सर्वनाशास कारणीभूत होतो" हाच इतिहासाचा नियम.

## जडोष्णता व मानसशास्त्र

मानसशास्त्रात मनोव्यापार अभ्यासले जातात. इथेसुद्धा शक्ती अभिप्रेत आहेच. या शक्तीला आपण जीवत्व–शक्ती ( Vital energy ) म्हणू. जेव्हा माणसाचे मन 'जागृत' अवस्थेत असते त्यावेळी ही शक्ती क्षीण होत जाते, व शेवटी संपुष्टात येते; म्हणजेच जडोष्णता सर्वाधिक होते.

## जडोष्णता व साहित्य

लंडन मॅगेझिन या इंग्रजी मासिकाच्या ऑक्टोबर १९७० च्या अंकात टोनी टॅन्नर ( Tony Tanner ) यांनी अमेरिकन कादंबरीकारावर लिहिलेला लेख मुद्दाम वाचण्यासारखा आहे. त्यांच्या मते जडोष्णता ही एक नुसती कल्पना नसून ते एक Entropology म्हणजे जडोष्णतेचे शास्त्र आहे. नॉर्मन बेलर, सॉल बेलो, जॉन बार्थ वगैरे लेखक या शास्त्रातील कल्पना जशाच्या तशा त्यांच्या कादंबरीत आणतात. मनुष्यजातीचा ऱ्हास होत होत शेवटी तिची माती होईल हे सांगताना Going to mud हा शब्दप्रयोग वापरतात. विश्वाच्या कोन्याकोपऱ्यात जिथे थोडीफार व्यवस्था आहे तिथे मानवी संस्कृती आढळते. कारण त्या भागापुरती

काही काळपर्यंत जडोष्णता स्थिरावल्यासारखी वाटते. हा युक्तिवाद ते वापरतात. निष्क्रियता, जडत्व, चेतनारहित अवस्था, वगैरे मनोभाव व्यक्त करताना या शास्त्रातील निरनिराळ्या संज्ञा वापरून ते आपले भाव बोलके करतात.

### जडोष्णता-तत्त्वज्ञान

विश्व हे नाशवंत आहे, जीव मर्त्य आहे व जीवन हे आभासात्मक आहे या व तशा प्रकारच्या कल्पना आपल्या तत्त्वज्ञानात आहेत. विज्ञानाने आपल्याला दुसऱ्या मार्गाने पण नेमक्या याच निष्कर्षाला आणून पोचवले आहे. याचाच अर्थ असा की उपासना वेगळी असली तरी अंतिम ज्ञानाचे स्वरूप एकच असते.



डॉ. सुमंत मुरंजन

# पुरोहित व पुरोहित जातींचा उदय

काल परवापर्यंत भारताच्या इतिहासास ऋग्वेदात आढळणाऱ्या आर्य लोकांच्या आक्रमक टोळयांच्या आगमनापासून प्रारंभ करण्याची प्रथा असे. ऋग्वेदांतर्गत ऋचा रचण्याचा काल सुमारे इ. स. पू. २५०० असावा. परंतु अलीकडच्या मोहेंजदारो, हरप्पा व इतर स्थानी केलेल्या उत्खननावरून असे दिसते की या टोळयांच्या आगमनापूर्वी किती तरी वर्षे आ लोकांच्या मानाने बरेच पुढारलेले आणि विस्तृत प्रदेशात पसरलेले एतद्देशीय समाज पंचनदप्रदेशात नांदत होते. तथापि उपलब्ध झालेल्या पुराव्यात अधिक भर पडेपर्यंत व विशेषतः त्या समाजात प्रचलित असलेली लेखनलिपी उलगडेपर्यंत इतिहासाचे हे नवे दालन निःसंदेहपणे ज्ञात होणे शक्य दिसत नाही.

आपणास 'आर्य' म्हणवून घेणाऱ्या भटक्या टोळ्यास वसतीकरता नवा देश वसवावयाचा होता. अडचण एवढीच होती की त्या प्राचीन काळी देखील पंचनदांचा प्रदेश निर्मनुष्य नसून माणसांनी व जनपदांनी गजबजलेला होता. ऋग्वेदात पणी म्हणून निर्देशलेली जनता मोहेंजदारो, हरप्पा वगैरे ठिकाणचे शहरवासी लोकच असण्याचा दाट संभव आहे. त्या काळच्या मानवी शिरस्त्याप्रमाणे स्थाईक लोकांचा निःपात करून आपला नवा 'आर्यावर्त' स्थापन करण्याचा उपक्रम या आक्रमक टोळयांनी सुरू केला. या निर्मूलनाच्या प्रकारात त्यांनी कोणताही हिंसक मार्ग शिल्लक ठेवलेला दिसत नाही. स्थाईक लोकांच्या कत्तलीतून गर्भवती बायकादेखील सुटत नसत. हातात सापडलेल्या कैद्यांची जिवंतपणी कातडी सोलून काढण्याचेही प्रयोग होत असत. आर्यांनी परकीय निर्दालनाचे एक शास्त्रच निर्माण केले होते व आपल्या हेतूप्रमाणे वा फलिताप्रमाणे त्यांनी प्रत्येक चढाईला निरनिराळी नावे देखील दिली होती. दस्युहत्या म्हणजे इकडील स्थाईक लोकांची कत्तल करण्याकरता लढाई. पुरभिद्यः म्हणजे इकडील लोकांची शहरे फोडण्याकरता लढाई. गोसाता म्हणजे गाई पळविण्याचे युद्ध. अर्कसाता किंवा वाजसाता म्हणजे धान्य लुटण्याचे युद्ध. धनसाता म्हणजे

अनुक्रमणिका

धनापहरण करण्याकरता चढाई. क्षेत्रस्य साता म्हणजे शेतवाडी काबीज करण्याकरता हल्ला. सर्वसाता म्हणजे सर्वस्व हरण करण्याचे युद्ध. यावरून पंचनदप्रदेशात नवा इतिहास कसा घडत होता याची कल्पना यावी.

ऋग्वेदातील आर्य इकडील स्थाईक लोकांस 'दास' किंवा 'दस्यु' असे नाव देतात. दास किंवा दस्यु या शब्दास पुढे जो अधिक्षेपदर्शक अर्थ आला तसला अर्थ मुळचाच असेल असे वाटत नाही. या वेदातच आर्यजमातींच्याच पुढाऱ्यांची नावे दिवोदास, सुदास अशी आढळतात. पुढे या आर्यांतच जेव्हा अंतस्थ यादवी माजली तेव्हा 'दास' वा 'दस्यु' जमातींचे साहाय्य घेण्यास 'आर्य' कचरले नाहीत. दाशराज्ञ युद्धात तरुण सुदासावर पाच 'आर्य' व पाच 'दस्यु' जमातींनी संगनमत करून स्वारी केली! तुर्वश जमातीचा सुश्रवस पोरवयाचा आहे असे पाहून तीन जमातींनी त्यावर हल्ला चढविला. आपल्याच दोस्त जमातींचा 'दास' किंवा 'दस्यु' या शब्दांनी अधिक्षेप करण्याचा हेतु असेल हे नैसर्गिक वाटत नाही. दास किंवा दस्यू यांचा मूलार्थ प्राणघातक वा शत्रू इतकाच असावा.

दास किंवा दस्यु यांच्या बरोबरच 'पणि' नांवाच्या अन्य शत्रूंचा उल्लेख ऋग्वेदांत आढळतो. कांही पंडितांच्या मते पणि ही एक इराणी जमात असावी असे आहे. परंतु पश्चिमेकडून येणाऱ्या 'आर्य' जमातींची त्याच दिशेकडून येणारी एक जमात शत्रू असावी हे सुसंगत दिसत नाही. पणि या शब्दाला पुढे व्यापारी असा अर्थ आला हे फार सूचक दिसते. मोहेंजदारो, हराप्पा वगैरे वसतिस्थाने जर ऋग्वेद समकालीन असतील तर तेथीलच रहिवासी पणिजनता असून आर्यांच्या जाळपोळीत व कत्तलीत तिचा निकाल लागला असावा. तेथील उत्खननात सापडलेले अवशेष ऋग्वेदात त्यांच्याविषयी लिंगपूजक वगैरे शब्दांनी केलेल्या अवहेलनापूर्वक प्रवादांशी चांगलेच जुळतात. या उध्वस्त शहरांत व इराक मेसापोटेमिया वगैरे सांपडलेल्या शिक्कयात इतके साम्य आहे की त्यावरून इराणच्या आखाताच्या मार्गाने त्या दोहोंमध्ये बराच व्यापार सुरू असावा असे सूचित होते. 'पणि' या शब्दाला पुढे 'व्यापारी' असा अर्थ कसा आला याचाही उलगडा यावरून सहज होतो.

## संघर्षमीमांसा

ज्यांचा नायनाट करावयाचा त्यांचा या नाही तर त्या कारणाकरता तिरस्कार करावयाचा हा मानवी मानसाचा अबाधित नियम आहे. असला तिरस्कार व अवहेलना ही आत्मसमर्थनाची साधने असतात. मग त्यांत दयामायेला अवसर

उरत नाही. ऋग्वेदांत या तिरस्काराची कारणे आढळतात ती अशी. सर्वात प्रबल कारण म्हणजे स्थायिक जमातींचा शरीरवर्ण. दस्यु किंवा दास म्हणजे 'कृष्ण वर्ण' असे सर्वत्र विशेषण आढळते. इतरत्र 'पिशङ्ग' असे विशेषण लावलेले आहे. काही ठिकाणी तर 'कृष्णयोनि' असा अधिक तिरस्कारव्यंजक शब्दप्रयोग केलेला आहे. दासलोकांची शरीरवर्णावरून अवहेलना चालविली म्हणून जेत्या आर्य जनतेचा हल्लींच्या अर्थाने श्वेत वर्ण होता असे अनुमान केले तर ते मात्र चुकीचे होणार आहे. आर्यांचा वर्ण गव्हापेक्षा जरा उजळ एवढाच. आर्यांची एक देवता इंद्र हिचा वर्ण 'हरित' असे वर्णन आहे त्यावरून आर्यांचा वर्ण स्पष्टच होतो.

दुसरे तिरस्काराचे कारण, दस्यूंची भाषा संस्कृत नव्हती व विशेषतः आर्यांस समजत नव्हती म्हणून ती ओबडधोबड ठरली ! असली ओबडधोबड भाषा बोलणारे म्हणून ते मृध्रवाक्। दस्यु हे अनास. मॅक्स मुल्लरने अनास याचा अ + नास असा समासविग्रह करून दस्यूंच्या नाकास लावलेले ते दूषण होय असा अर्थ लावला होता. परंतु सायणाचार्यांनी अन् + आस असा विग्रह करून दस्यूना संस्कृत बोलणे साधत नाही वा बोलत नाही म्हणून त्याना तोंडच नाही असा शिवराळ अर्थ सूचित केला आहे, तेच अधिक योग्य वाटते.

आणखी एक कारण प्रत्यक्ष देवांनीच निर्माण केले. प्राचीन युगात जमातीचे देव हे त्या त्या जमातीची खाजगी मालमत्ता असे. कालांतराने संघर्ष उत्पन्न झाल्यावर एका जमातीचे देव दुसऱ्या जमातींचे सैतान ठरत. इराणी जमातींचा देव 'अहुर' हा पुढे भारतीय आर्यशाखेचा 'असुर' झाला हे सुविदितच आहे. दस्यु यज्ञ करीत नसत, त्यांच्यात लिंगपूजा, पशुपूजा सर्रास होती हे एक त्यांची नालस्ती करण्यास चांगले साधन हाती आले. 'शिश्नदेव' ही एक इरसाल शिवी आर्य स्थायिक जनतेस देत असत. या संदर्भात, मोहेंजदारो, हराप्पा वगैरे उत्खननात लिंगपूजा, पशुपूजा सुचविणारे अवशेष सापडले आहेत हे फार सूचक वाटते. पणिलोकात शिवपूजा प्रचलित असण्याचा फार संभव आहे व ऋग्वेदातील रुद्राचे याच शिवात पुढे रूपांतर झाले असेल तर ते नैसर्गिक समजले पाहिजे.

पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे आर्यदस्यू यांचा झगडा म्हणजे पुढारलेली संस्कृति व मागासलेली संस्कृति यांचा संघर्ष होता व त्यात पुढारलेली संस्कृति विजयी झाली असे अनुमान काढले तर ते चुकीचे होणार आहे. तसे पाहिले तर दस्यु व विशेषतः पणि हीच जनता अधिक पुढारलेली होती. युद्धकलेत मागासलेल्या परंतु संस्कृतिसंपन्न समाजास अधिक प्रभावी आयुधांनी सज्ज परंतु इतर दृष्टीने

रानवट असलेल्या धटिंगणाना हार जावे लागले याची कित्येक उदाहरणे इतिहासात सापडतात. व्हँडल व गॉथ लोकानी रोमन साम्राज्याची धूळधाण केली. इस्लामी आक्रमकांचे घोडदळ आणि पुराणशास्त्रप्रणीत, हत्तिप्रधान, अवजडबोजड हिंदु संग्रामदलांची गाठ पडली तेव्हा प्रचंड संख्या असूनही हिंदूंचा धुव्वा उडाला. तोच अनुभव भारतास प्राचीन कालीही आला. आर्यांच्या जवळ कृष्णलोह म्हणजे लोखंडांची शस्त्रे असावीत असे वाटते. घोडे व रथ यांचा प्रवेश आर्यांच्या बरोबरच झाला. त्यांच्या पुढे फक्त तांबे ही धातु माहीत असेलल्या व शांततापूर्ण जीवनास रुळलेल्या स्थायिक जनतेचा टिकाव लागला नाही.

दस्यूंची लांडगेतोड ऋग्वेदकालीच अगदी अलीकडची म्हणजे १ ले व १० वे मंडल रचण्यापूर्वीच संपुष्टात आली. त्यानंतर शांतता व सलोखा निर्माण होण्यास तशीच कारणे झाली. आर्य व दस्यू यांच्या संघर्षाची फलश्रुति नुसत्या धन, धान्य, उर्वर व क्षेत्र जमीन, गाईंसी खिल्लारे यांच्या लुटीनीच होत नसे. पुत्रसंख्या वाढावी म्हणून या फलश्रुतीत दस्यूंच्या स्त्रियाही येत असत. ऋग्वेदातील कृष्णवर्ण ऋषींची संख्या लक्षात घेतली म्हणजे काय घडत असावे याची चांगली कल्पना येते. शिवाय हिंसेचा मार्ग चोखाळणारावर हिंसा केव्हातरी उलटते हा सर्वसामान्य अनुभव आहे. दाशराज्ञ युद्ध या विख्यात प्रकरणात आर्यजमाती एकमेकावरच कशा उलटल्या ते स्पष्ट दिसते. त्या अंतर्गत यादवीत त्याना दस्यु जमातींचीच मदत घ्यावी लागली. या सर्वावरून वर्णद्वेष बराच निवळून परस्पर साहाय्यापर्यंत कशी प्रगति झाली असावी ते सिद्ध होते. पूर्वीच्या ऋचांची आर्ष भाषा, वाक्यरचना व नंतरच्या पुरुषसूक्तातील कालिदासाच्याही कालास शोभणारी ओघवती वाक्यरचना, नवीन शब्दांचा भरणा वगैरे लक्षात घेतले तर संघर्ष व सलोखा यातील मध्यंतर किती दीर्घ असले पाहिजे याची कल्पना येते.

## ऋग्वेदांतील धर्म व पुरोहितांचा उदय

इतर पुरातन मानवाप्रमाणे आर्य लोकही निसर्गाची शक्ति आणि प्रसंगी अनुभवास येणारे त्याचे रौद्रस्वरूप यांच्या दर्शनाने नम्र होत असत. भीती आणि उपासना यात पुरातन काळी विशेष अंतर नसे. ऋग्वेदातील प्रमुख देवता अग्नि, इंद्र व वरुण अशा तीन आहेत. एकंदर १०१७ सूक्त-स्तोत्रांपैकी चाळीस वगळली व इतर सर्व या देवतांच्या आराधनेकरता प्रकट झाली आहेत. जमातीच्या कुंडात सदैव राखलेली ज्वाला, नियमितपणे उदयास येणारा व अस्तास जाणारा सूर्य, आकाशात कडाडणारी विद्युत् या स्वरूपात प्रतीतीस येणारी व नीति अनीतिविषयाच्या पलीकडची अशी अग्निदेवता होती. ग्रीक वगैरे प्राचीन

लोकांत अग्नि प्रथम पृथ्वीवर कसा उतरला याविषयी ज्या कथा प्रचलित असत त्यावरून अग्नीचे पुरातन काली किती महत्त्व असे त्याचा सहज अंदाज येतो. इंद्रदेवतेच्या उत्पत्तिविषयी तीन निरनिराळ्या कल्पना वेदाभ्यासूनी सुचविलेल्या आहेत. परंतु आर्यजमातींचा रणांगणातील म्होरक्या असे स्वरूप जसजसे त्याना येऊ लागले तसतसा इंद्र अधिक अधिक माणसात जमा होऊ लागला असा अनुभव येतो. आत्मप्रौढीखोर, यथेच्छ पिणारा, सुंदर स्त्रियांनागे लागणारा असे सर्वसाधारण माणसांचे व विशेषत: रणझुंझाराचे ढोबळ अवगुण त्यांच्यात उतरू लागले व इंद्र बलाढ्य 'राष्ट्रीय' दैवत बनला. सजीव व निर्जीव सृष्टीत दिसून येणारी– व्यवस्थितपणा, नियमबद्धता व अनुक्रम यांची– जाणीवही आर्यमानसात खोल रुजली व त्यानी त्याचे 'ऋत' असे नामाभिधान केले. या ऋताची देवता वरुण या सात्विक स्वरूपात आर्यजनतेत प्रकटली.

आदिमानवाने देवतांची स्तवने रचली ती त्यांचा कोप शांत करण्याकरिता होती की त्यांना प्रसन्न करून वर प्राप्त करून घेण्याकरिता होती हे निश्चित करणे आज शक्य नाही. एवढे खरे की माणूस जर स्तुतीस भाळतो तर देवता-नीही का भाळू नये! ऋग्वेद हा देवतांना आळविण्याकरिता व त्यांच्याकडून ऐहिक सुखसमाधान मागून घेण्याकरिता प्रसवलेल्या स्तोत्रांचा संग्रह आहे. त्यातल्या त्यात ज्यांच्यात कवित्व स्फुरत होते त्या व्यक्तींनी स्तोत्रे रचण्याचे कार्य साहजिकच आपल्याकडे घेतले. अशी स्तोत्रे उच्चारणारे व गाणारे ते 'ब्राह्मण' म्हणून ओळखले जात असत. ब्राह्मण या शब्दाची पूर्वपीठिका अशी आहे.

अग्नीला निसर्गदेवतात स्थान मिळण्यापूर्वी भटक्या जमातीत अग्नि चोवीस तास कसा प्रज्वलित राखावयाचा ही मोठीच अडचण होती. कदाचित पशूंचे कळप राखून उपजीविका करणाऱ्या जमातीत हे कार्य तेवढे दुर्घट नव्हते; परंतु आर्यांनी भारतात वसती केली तेव्हा या प्रश्नाचे स्वरूप आमूलाग्र पालटले. स्थायिक लोकांकडून आर्य लोक शेतकी शिकले. कळपातील जीवन संपून कौटुम्बिक जीवनाचा प्रारंभ झाला. जमातीचा सर्वसाधारण अग्नि शांत होऊन कुटुंबात तो प्रज्वलित ठेवण्याचा प्रघात पडला. अग्निदेवतेला कौटुम्बिक स्वरूप आले हाच अग्निहोत्राचा प्रारंभ.

हे अग्निहोत्र सांभाळण्यात दोन अडचणी होत्या. एकतर कोणातरी एका इसमास होमकुंडासन्निध सतत घरात बसणे प्राप्त होते. त्याकाळची कुटुंबे संयुक्त व म्हणून मोठी असल्याकारणाने प्रथम प्रथम तरी माणसाची अडचण तीव्रतेने भासण्यासारखी नव्हती.

दुसरी अडचण जरा जास्त जिकीरीची असावी. अग्निकुंडाचे सातत्य ठेवा-वयाचे तर कमीतकमी दोन गाई, हजारो शेणी व समिधा तयार राखणे अवश्य होते, विस्तृत कुटुंबात ही इतकी सामुग्री तयार राखणे ही साधी गोष्ट नव्हती. तोपर्यंत आर्यसमाजात श्रमविभागणी बरीच मूळ धरू लागली होती. इकडील लोकांकडून शेतकी-कालवे, कापसाची वस्त्रे, लाकडाचे सुतारकाम, नागरी बांधकामे, चामडयाच्या व हस्तिदंताच्या मौल्यवान वस्तु वगैरे कलाकौशल्यास संलग्न अशा कलाहुन्नरी आर्यांनी आत्मसात केलेल्या दिसतात. इकडील लोकांचा बेकनाटान् म्हणजे व्याज-बट्टा करणारे असा ऋग्वेदात उपहास केलेला आहे त्यावरून कोणत्यातरी स्वरूपात चलन सुरू असले पाहिजे असा कयास आहे. 'निष्क' या शब्दाचा अर्थ नाणे असा अथवा दागिना असा घ्यावयाचा की काय हे संशयितच आहे. चलन हे श्रम-विभागणीच्या विविधत्वाचे सहोदर आहे हे निराळे सांगणे नकोच.

या अडचणीतून एकच सुटका होती. प्रत्येक कुटुंबाने आपआपले अग्निहोत्र सांभाळण्याऐवजी श्रमविभागाचे तत्व अग्निहोत्रासही लागू करणे ही ती सुटका होय. प्रत्येक वसतीत एकाच कुटुंबाने अग्निहोत्राची जबाबदारी आपल्याकडे घेतली म्हणजे इतर कुटुंबांची दगदग आपोआप मिटणार होती.

पुरोहिती कुटुंबास आरंभ झाला तो असा. हळु हळु अग्निहोत्रासभोवती अनेक अर्चाप्रकारांचा समावेश झाला. देवताना संतुष्ट ठेवण्याकरता स्तोत्रे रचणे देवतांच्या नावाने आहुती समर्पण करणे, मौल्यवान वस्तु वहाणे, वगैरे विविध स्वरूपाच्या अर्चना प्रचारात येऊ लागल्या. त्यांचा कालानुक्रम शोधणे आज जवळ जवळ अशक्यच होऊन बसले आहे. तथापि या सर्व अर्चनांच्या हेतूविषयी आर्यांनी बिलकूल आडपडदा ठेवला नव्हता. त्यांची जीवनदृष्टी रोखठोक व्यवहाराची होती. देवतांची आराधना करावी व त्याच्या मोबदल्यात देवतांनी आपणांस धनधान्य, स्त्रिया, अपत्यें यांची खैरात करावी असा तो सरळ व्यवहार होता. देवतांशी रदबदली करण्याचा ज्यांचा मान त्या पुरोहितांचे सामाजिक स्थान उंचावत गेले यांत आश्चर्य नाही.

पुरोहित कुटुंबांचे महत्व वाढण्यास आणखी एक कारण असण्याचा संभव आहे. मोहेंजदारो, हराप्पा वगैरे स्थानकांच्या उत्खननावरून असे दिसते की त्या जमातीत पुरोहितवर्गाचे फार प्रस्थ असावे. तेथील रहिवासी व ऋग्वेदांत निर्देशिलेल्या पणि जमाती जर एकच असतील तर आर्यांची व दस्युपणींची दिल-जमाई झाल्यावर मूळचा एतद्देशीय पुरोहितवर्ग नव्या जनसमूहांत शिरण्याचा बराच संभव आहे. आजतरी पणींची पुरोहिती प्रथा हा निवळ तर्क असल्या कारणाने त्याविषयी अधिक चर्चा करणे योग्य होणार नाही.

अनुक्रमणिका

स्तोत्रे, नैवद्य, आहुती वगैरे समर्पणास एवढे महत्व कसे आले ते समजण्याकरता आर्यांची जीवनदृष्टी लक्षात घेतली पाहिजे. उपनिषद-काली व नंतर, पुनर्जन्म, कर्मवाद वगैरे कल्पनांनी त्यांच्या वंशजांकरता जो मानसिक तुरुंग निर्माण केला त्याचा मागमूसही ऋग्वेदकाली आढळत नाही. अग्नीपासून ठिणगी उडावी व नंतर ती अग्नीतच विलीन व्हावी तद्वतच ब्रह्मापासून चैतन्य निघते व ब्रह्मातच ते परत जाते एवढीच त्यांची पार्थिव जीवनाची कल्पना होती. देवयान, पितृयाण, फार तर रात्री प्रकाशणारा चंद्र एवढाच प्रवास मृत्यूनंतर चैतन्यास असतो एवढेच त्यांचे परलोकाचे कल्पनाविश्व असे. मागील व पुढील जन्मांची उठाठेव व केलेल्या कर्माची गहन गती या गोष्टी सुचल्या त्या उपनिषद्काली· विश्व आर्यमय करण्याची महत्वाकांक्षा त्यांच्यात प्रबलेली नव्हती तरी देवतांच्या कृपेने सर्व ऐहिक भोग ' याची देही याची डोळा ' पहावे अशीच त्यांची ईर्षा होती.

अशा तऱ्हेने मुळच्या जानपदिक यज्ञाचा कौटुंबिक अग्निहोत्रात विस्तार झाला. अग्निहोत्र ही कौटुंबिक संस्था झाली. यज्ञ प्रथमपासूनच सामाजिक स्वरूपाचे असले तरी कालांतराने त्यात प्रकारभेद दिसू लागले. सर्व जमातींच्या हिताचा हेतू लुप्त होऊन यज्ञप्रकाराप्रमाणे यज्ञकर्त्या यजमानाचे कल्याण प्रामुख्याने त्यात अभिप्रेत होऊ लागले. यज्ञाची झळ जरी सर्वसामान्य समाजास लागत असे तरी त्यापासून ऐहिक फल मात्र काही अंशी यजमान व बहुतांशी पुरोहित यांच्यापुरतेच मर्यादित राहिले. पुरोहितांच्या आर्थिक आणि सामाजिक प्राबल्याचा पहिला अंक सुरू झाला.

मुळचा यज्ञ व नंतरचे अग्निहोत्र यातील मध्यंतर बरेच दीर्घ असले पाहिजे. नवे यज्ञ यथासांग करावयाचे म्हणजे त्यात ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद, ब्राह्मणे आलीच. ऋग्वेद आणि इतर प्रमाणग्रंथ यामध्ये बराच काळ लोटला हे सर्वमान्यच आहे. शिवाय नव्या यज्ञांची प्रतवारी-वर्गवारी पाहिली म्हणजे एक नवीनच वर्गप्रधान समाज अस्तित्वात आला होता असे तेव्हाच लक्षात येते. पुरोहित, राज्यकर्ते, धनिक लोक, सर्वसामान्य व श्रमिक लोक इत्यादी नाना तऱ्हेचे समाजघटक या नव्या यज्ञास पायाभूत होते. हे समाजपरिवर्तन घडण्यास काही शतके तरी लागली असतील आणि त्या दीर्घकालात पुरोहितांची संख्या, महत्त्व आणि सत्ता यात चांगलीच वाढ झाली असली पाहिजे.

निरनिराळ्या यज्ञांची योजना करण्यात पुरोहितवर्गाची आर्थिक दृष्टी व व्यवहारज्ञता ही चांगलीच प्रत्ययास येतात. यजमानांच्या आर्थिक शक्तीस झेपतील अशीच नव्या यज्ञांची रचना असे. यज्ञाकरिता कमीत कमी चार पुरोहित अवश्य असत. आहुती देताना ऋग्वेदाच्या ऋचा म्हणणारा 'होता', सामवेदाप्रमाणे

यज्ञमंत्र गाणारा 'उद्गाता', यज्ञकर्मावर देखरेख ठेवणारा 'ब्रह्मा', आणि यजुर्वेदाप्रमाणे यज्ञाची सर्व मांडणी करणारा 'अध्वर्यु' हे ते चार पुरोहित होत. परंतु उपपुरोहित किती असावेत याबद्दल निर्बंध दिसत नाही. यजमानाच्या आर्थिक दर्जाप्रमाणे ती संख्या कमी जास्त होत असे.

यज्ञांचे तीन प्रकार दिसतात. पहिल्या प्रकारचे यज्ञ सर्वांत कमी खर्चाचे असत. त्यात चार पुरोहितांचा दर्शपूर्णमास, पाच पुरोहितांचा चातुर्मास, सहा पुरोहितांचा पशुबंध वा निरूढ पशुबंध वगैरे मोडतात.

सोमयज्ञ हे दुसऱ्या प्रकारचे यज्ञ होत. सोमयज्ञ फक्त धनिकांनाच शक्य होते. हे यज्ञ एक दिवसापासून बारा दिवसांपर्यंत व काही तर त्यापेक्षाही जास्त काळ चालत असत. सोमयज्ञास १६ ऋत्विज व ७, २१, ६०, १००, ११२, १००० अथवा यापेक्षाही बहुसंख्य पुरोहित लागत. अग्निष्टोम, वाजपेय, कुरुवाजपेय इत्यादींची गणना या प्रकारात होते. वाजपेय यज्ञ आधिपत्य इच्छिणाऱ्या फक्त ब्राह्मण-क्षत्रियांकरता होता.

राजसूय, अश्वमेध, गवामयन यासारखे तिसऱ्या प्रकारचे यज्ञ राज्य गाजविणाऱ्या करताच होते. राजसूय यज्ञ फक्त क्षत्रियाकरता असून त्याची लांबण दोन वर्षांपेक्षाही जास्त असे. अश्वमेधयज्ञाचा अश्व एक वर्षभर फिरून आल्यावर यज्ञ तीन दिवसात समाप्त होई. गवामयन एक वर्षभर लांबत असे. याज्ञवल्क्याच्या अंदाजाप्रमाणे तीन वर्षे पुरेल इतके धान्य ज्यांच्या संग्रही असेल त्यांनाच ही धार्मिक उधळपट्टी शक्य होती.

## पुरोहितांची वाढती धनतृष्णा

यज्ञाच्या निमित्ताने पुरोहितांची दाने व दक्षिणा यांचा फापटपसारा पसरतच गेला यात नवल नाही. त्यात नवे यज्ञ व अग्निहोत्र यांची चांगलीच भर पडली. अग्निहोत्राचे कर्तव्य निवडक कुटुंबावर ठेवल्यावर त्या कुटुंबांच्या योगक्षेमाचा भार इतरांनी आपल्याकडे घ्यावा हे ओघानेच आले. निदान अग्निहोत्रास लागणारी अवश्य सामुग्री पुरविणे इतरांस भागच होते. दाने व दक्षिणा यांचा प्रघात या परिस्थितीत नैसर्गिकतःच पडला. एकदा अशी प्रथा पडल्यावर दानांचे प्रसंग व प्रमाण यांची अवास्तव वाढ करण्याचा पुरोहितांनी प्रयत्न केला हेही तेवढेच नैसर्गिक होते. पूर्वी नमूद केल्याप्रमाणे आर्यांची जीवनासक्ति इतकी प्रबळ होती की त्याला पुरोहितांची कुटुंबे अपवाद असण्याचे काहीच कारण नव्हते.

'अग्निष्टोम' यज्ञात वडील मुलाचा वारसा वगळून आपले इतर सर्व धन दान म्हणून यजमान पुरोहितास देत असे. निरनिराळ्या पुरोहितात त्यांच्या दर्जाप्रमाणे दक्षिणा कशी वाटावी याविषयी शास्त्रोक्त नियम होते. या दक्षिणेत

बोकड, बकरी, घोडे, हत्ती, गर्दभ, गुलाम, धान्य व रथ यांचा समावेश असे एवढेच नाही तर यजमानाची मुलगीदेखील प्रमुख पुरोहितास विवाहात मिळत असे.

'वाजपेय' यज्ञात ऋत्विजाच्या गळ्यात सोन्याच्या माळा पडत. होत्याच्या माळेत शंभर सुवर्ण कमलफुले व रत्ने असत. यजमानाचा रथ व अश्व सोडून १७०० गाई, १७ अश्व, १७ गुरे, १७ बैल, १७ रथ, १७ सुवर्ण निष्क गळ्यात घातलेल्या गुलाम 'स्त्रिया' व १७ हत्ती इतके धन दान करावे लागे. इतर वाजपेयांत तर १७०० पासून १७००० गाईंची खैरात विहित होती.

क्षत्रियांच्या राजसूय यज्ञात यजमानाच्या अथवा राजाच्या अभिषेककाली ४ ऋग्विजांस प्रत्येकी ३२००० गाई, त्यांच्या सदतनिसास प्रत्येकी १६००० गाई, त्यांच्या हस्तकास प्रत्येकी ८००० गाई व अगदी शेवटील पुरोहितास प्रत्येकी ४००० गाई अशा एकंदर २,४०,००० गाईंचे दान घडत असे. परंतु ही दानांची संक्रांत फक्त यजमानापुरतीच मर्यादित नव्हती. यजमानाचे नातलगांना देखील त्यात सामील व्हावे लागत असे. नातलगांच्या धनाचा $\frac{1}{3}$ भाग ऋत्विजास व $\frac{1}{3}$ भाग सत्पात्र ब्राह्मणास द्यावा लागे व उरलेला $\frac{1}{3}$ नातलगास परत मिळे; या सर्व वाटपानंतर शुनःशेपाच्या कथेची सांगता म्हणून आणखी दक्षिणा द्याव्या लागत त्या निराळ्याच.

अश्वमेध यज्ञाच्या प्रकरणात मात्र धार्मिक लुटारूपणाची अंतिम सीमाच गाठलेली आहे. निरनिराळ्या दिवशी निरनिराळी दाने चालत. पहिल्या व तिसऱ्या दिवशी होत्यास १००० गाईंचे दान विहित असे. दुसऱ्या दिवशी एका निर्दिष्ट प्रदेशातील अथवा अश्वमेध युद्धात जिंकलेल्या मुलुखाच्या पूर्वदिशेच्या प्रदेशातील अब्राह्मणांचे सर्व धन होत्याच्या मालकीचे होत असे. उरलेल्या तीन दिशांकडचे धन उद्गाता, अध्वर्यु व ब्रह्मा यांच्याकरता राखलेले असे. हे सर्व धन वाटणे व्यवहार्य नसेल तर प्रत्येक पुरोहित फक्त ४०,००० गाई घेऊन संतोषी होई. आश्वलायन धर्मसूत्रात जमीन व माणसे वर्ज्य करून चारी दिशांच्या अब्राह्मणांची धने दक्षिणा म्हणून द्यावी अशी शिफारस आहे.

यज्ञाशिवाय दाने नाहीत व दानाशिवाय यज्ञ नाहीत हा प्रकार बराच नंतरचा आहे. यज्ञसंस्था दानाच्या मानाने जुनी असून भारतात पाऊल घालतानाच आर्यांनी आपल्याबरोबर आणली होती. दानांचे स्तोम माजले ते पुरोहितांची खास कुटुंबे अस्तित्वात आल्यावर व मुळच्या यज्ञाची विविध रूपांतरे त्यांनी घडवीत असताना. हत्ती, गुलाम स्त्रिया यांचा समावेश दानात आढळतो त्यावरून भारतात प्रवेश केल्यावर व बराच काळ लोटल्यावर असले यज्ञ अस्तित्वात आले हे स्पष्ट दिसते. सुवर्ण निष्कांचा उल्लेख असला व निष्क म्हणजे सुवर्ण चलन असा अर्थ

केला तरी सुवर्ण अद्याप मुबलक नसावे असे वाटते. मुख्य चलन गाई हेच असून संपत्तीची मोजदाद प्राचीन ग्रीक व इतर जमातींप्रमाणे गाईंनीच होत असे, दानात बहुसंख्याक गाई दिसतात ते या कारणास्तव. दानांची बेफाट स्तुती ऋग्वेदाच्या पहिल्या व दहाव्या मंडलात प्रामुख्याने आढळते ते फार सूचक आहे. पहिले व दहावे ही मंडले इतर मंडलांच्या मानाने बरीच अलीकडची याविषयी वेद-पंडितात दुमत नाही. अकरा सूक्तांच्या वालखिल्य सूक्तांतील दानस्तुती प्रख्यात आहे. वालखिल्य सक्त ऋग्वेदसंहितेचे अंग समजले जात नाही हे सुविदित आहे.

दानस्तुतिपर बेफाट शब्दांचा एकच मासला म्हणून पुढील ऋचा मननीय ठराव्या. "यज्ञाच्या यजमानाचे औदार्य प्रकट झाले व (म्हणून) जगाची अंधकारापासून मुक्ती झाली. यज्ञाच्या खर्चाची सन्मान्य धनवान् क्षिती न बाळगता यज्ञ म्हणजे आपले औदार्य व वृष्टी करणारा वायु व प्रकाश देणारा सूर्य यांना प्रसन्न करण्याची सुवर्णसंधी असेच मानतात ...... ज्याने दानसंस्था प्रथम निर्मिली तो माणसांचा प्रथम शासकच म्हटला पाहिजे. कोणी कोणी त्यास 'ऋषी, ब्रह्मन्, सामगायक, स्तोत्रकर्ता, यजमानाग्रणी अशी नावे देतात. यज्ञाचे पहिले दान ज्याने दिले त्यानेच सूर्य, मेघगर्जना व अग्नी ही ईश्वराची तीन स्वरूपे जाणली ...... हे देवता हो, दान देणाऱ्यास युद्धकाली साहाय्य द्या; त्याचा शत्रूवर विजय ठेवलेलाच आहे."

सामवेद यजुर्वेद, अथर्ववेद व त्यांना संलग्न असलेली ब्राह्मणे यात यज्ञसंस्थेचे स्वरूप किती वर्गीय बनले ते अगदी उघड व निःसंदेह अनुभवास येते. ऋग्वेदाची छंदोरचना व ब्राह्मणांतील संस्कृत भाषेतली गद्यरचना या मधील कालांतर फारच दीर्घ असले पाहिजे. आर्थिक स्वार्थदृष्टी कोणत्याही वर्गास किती बेलगाम बनवू शकते त्याचा ब्राह्मणे ही मूर्तिमंत पुरावाच आहेत. मॅक्स मुल्लरने ब्राह्मणग्रंथांचे केलेले समीक्षण सार्थच आहे. "उथळ व निर्जीव वक्तृत्व, पुरोहितवर्गाची आत्मप्रौढी व प्रथम मानवाचे शब्दपांडित्य यांनी ब्राह्मणे बरबटलेली आहेत. एखाद्या उदयोन्मुख नव्या राष्ट्राची प्रगती भटशाही व धार्मिक थोतांडे कशी अडवू शकतात याचा हे ग्रंथ म्हणजे ऐतिहासिक पुरावाच आहेत. एखाद्या निर्बुद्ध वैदूची बडबड व वेडपटांचे प्रलाप जसे अभ्यासावे त्याच दृष्टीने हे ग्रंथ तपासले पाहिजेत."

पुरोहितांचा व यज्ञसंस्थेचा विस्तार ब्राह्मणकाली ऋग्वेदकालीन पंचनद-प्रदेश अथवा गंगायमुनेचे खोरे एवढ्या प्रदेशापुरताच मर्यादित राहिला नव्हता. कंदाहारपासून बंगालपर्यंत व काश्मीरपासून दक्षिणपथापर्यंत हा नवा आर्य दस्यूंचा समाज पसरला होता.



डॉ. र. चिं. बडवे, कुमठा

# धर्म व मानवी जीवनात त्याचे स्थान : १

## ( मानसशास्त्रीय दृष्टिकोनातून )

धर्म या संस्थेचे अस्तित्व कोणत्याना कोणत्या स्वरूपात पृथ्वीवरील प्रदेशात अगदी आदिमानवाच्या काळापासून आजतागायत दिसून येत असले व मानवी मनाच्या विकासाबरोबरच धर्माच्या स्वरूपाचाही विकास होत गेलेला असला तरी या संस्थेवर चालू शतकात जितके प्रहार होताना दिसतात तितके पूर्वी क्वचितच होत असत. आपल्या देशापुरते बोलायचे झाले तर प्राचीन काळी चार्वाकांनी धर्माच्या नावावर प्रचलित असलेल्या ज्ञान व कर्मकांडावर प्राणान्तिक प्रहार केलेले आहेत. धर्माचा समूळ उच्छेदच करण्याचा त्यांचा आग्रह दिसतो. जैन व बौद्ध धर्मीयांनीही वैदिक धर्माच्या ज्ञान व कर्मकांडावर असेच हल्ले चढविलेले असले तरी त्यामागील त्यांची दृष्टी धर्माच्या उच्छेदनाची नसून त्यात त्यांच्या दृष्टीने आवश्यक अशी सुधारणा घडवून आणण्याची होती. चालू शतकातील प्रहार हे मुख्यतः बुद्धिवादाच्या आश्रयाने व विज्ञानाच्या प्रभावामुळे होत आहेत; व त्यात क्वचित धर्माच्या उच्छेदनाचा पुरस्कार होत असलेला दिसत असला तरी अंधश्रद्धेला काट देऊन धर्माचे स्वरूप शुद्ध करण्याचीच दृष्टि मुख्यतः दिसून येते. उलटपक्षी धर्माच्या पुरस्कर्त्यांकडूनही धर्माची बाजू जोरदारपणे मांडण्याची कोशीस करण्यात येते. मात्र आधुनिक नियतकालिके त्यांना आपली बाजू मांडण्याची संधी देण्यास फारशी उत्सुक नसतात. स्वाभाविकपणेच धर्मविरोधी बाजू जनतेपुढे जितक्या प्रकर्षाने येते तितकी धर्मपुरस्कर्त्यांची येत नाही. असे असले तरीही धर्मविरोधी प्रहारांनी जनतेच्या धर्मविषयक प्रत्यक्ष आचरणात फरक गोगलगाईच्याच गतीने होतो. याचे कारण इतकेच दिसते की ही वादावादी कितीही मनोरंजक व बुद्धीला खाद्य पुरविणारी असली तरी सत्य नेमके कोठे आहे हे त्यातून बहुधा स्पष्ट होत नाही व त्यामुळे सामान्य माणसे भांबावून जातात व शेवटी परंपरेच्या धोपट मार्गाने वाटचाल करीत राहतात. आपापल्या

अनुक्रमणिका

पक्षाचे मंडन व प्रतिपक्षीयांचे खंडन करण्यात सौम्य व समजुतदार मंडळी जशी दोन्ही बाजूकडे तशीच धर्म ही अफूची गोळी आहे या टोकापासून धर्म-विहीन माणूस म्हणजे 'साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः' या टोकापर्यंत आत्यंतिक मतांना पुरस्कारणारेही आहेत. हा मतामतांचा गलबला पाहून सामान्य माणसाची अवस्था त्रिशंकूसारखी झाल्यास नवल नाही. या अवस्थेचा परिणाम वैयक्तिक व सामाजिक जीवनावर अनिष्ट होतो. त्यातील स्थैर्याला तडा जातो व समाज ढवळून निघू लागतो. धारणात् धर्ममित्याहुः हे धर्माचे मुख्य कार्य संकटात येते. निरनिराळे धर्मपंथीय परस्परांचा नाश करण्यास प्रवृत्त होतात. नीतिनिर्बंधांना तिलांजली देऊन मनःपूतं समाचरेत् या चालीवर वर्तन करण्यास प्रवृत्त होतात. सत्यासत्य व इष्टानिष्ट यांचा विवेक सुटू लागतो. व एकंदरीने समाजाची अधोगती होऊ लागते. हे टाळण्याचा मार्ग म्हणजे विविध प्रकारच्या उलट सुलट घोषणा व भावना यांच्या आहारी न जाता मूळ सत्याचा शोध घेणे हा होय. हा शोध अनेक दृष्टींनी घेता येण्याजोगा असला तरी तितक्या खोलात न शिरता मानवी मनाची निसर्गनिर्मित घडण नजरेसमोर ठेवून विचार करता करता हाती काय लागते हेच फक्त पहाण्याचा मर्यादित हेतू या लेखाच्या बुडाशी आहे. आजकाल प्रसिद्ध होणाऱ्या धर्मविषयक वाङ्मयात हा अत्यंत महत्त्वाचा दृष्टिकोन बहुधा बराचसा उपेक्षित रहातो असे वाटल्यानेच या लेखाचा प्रपंच करीत आहे. तो वाचताना धर्माशी प्रत्यक्षाप्रत्यक्ष संबंधित असलेले, नवभारतात पूर्वी प्रसिद्ध झालेले माझे लेख वाचणारे बहुश्रुत व विवेकी वाचक तरी निदान मी अंधःश्रद्धा, मतांधता, जातीयता वा स्वार्थ इत्यादींच्या आहारी जाऊन लिखाण करतो असा आरोप करणार नाहीत अशी आशा करतो.

धर्म या शब्दाची विद्वत्संमत अशी काटेकोर व्याख्या करणे कठीण असल्याने त्या चर्चेत न उतरता, सामान्यतः रूढ असलेला व सर्वांना सहज समजणारा अर्थच इथे घेऊन चालू. या विश्वाच्या बुडाशी कोणत्या तरी महान शक्तीचे (म्हणजेच ईश्वराचे) अस्तित्व श्रद्धेने मानून तिची उपासना वा भक्ती करण्याचे परंपरेने घालून दिलेले मार्ग अनुसरणे हाच ढोबळ मानाने तो अर्थ होय. हे मार्ग परिस्थितीनुरूप व कालांतराने हळूहळू बदलत असले व त्यानुसार कर्मकांडातही परिवर्तन होत राहिले तरी हे बदल शक्य तो कमी प्रमाणात करावे अशीच वृत्ती एकंदरीने सर्वत्र दिसून येते हे लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. क्रांतिकारक स्वरूपाचे बदल होत नाहीत असे नाही; परंतु त्यांचे प्रमाण अल्प असते. तसेच, होणारे बदल हे सर्वसाधारणपणे पिढी बदलल्यावर होतात. हे सूत्र लक्षात घेऊन आता मुख्य विषयाकडे वळू.

शरीरात मन नावाची काही वस्तु आहे की नाही याबद्दल वर्तनवादी व त्यांचे सहप्रवासी काहीही म्हणत असले तरी त्यांचे अस्तित्व ही प्रत्यक्ष अनुभवाची गोष्ट आहे याबद्दल मला जराही शंका नाही. शरिरातील विविध भागांच्या क्रियांचे नियंत्रण ज्याप्रमाणे मेंदूकडून केले जाते त्याच प्रमाणे मनुष्याच्या वर्तनाचे नियंत्रण मनाकडून केले जाते. शरीर व मन सामान्यपणे परस्परानुकूल असली तरी ती तशी १०० % असतातच असे म्हणता येत नाही. उदाहरणार्थ दुबळ्या शरिराचा माणूस मनानेही दुबळा असण्याची शक्यता बऱ्याच अंशी असली तरी तो तसा असेलच असे निश्चयाने म्हणता यावयाचे नाही. वर्तनाचे नियंत्रण मन करीत असल्याने वर्तन समजण्यास मनाचा अभ्यास अपरिहार्य ठरतो, हे स्पष्टच आहे. मनाचा यथायोग्य अभ्यास न करता वर्तनासंबंधी बरेवाईट विवेचन करणे म्हणजे रामाला वगळून रामायणाचा अर्थ लावण्यासारखेच निरर्थक होय. सामान्य वर्तनाच्या संदर्भात मनाचे हे महत्त्व जसे निर्विवाद आहे तसेच ते धार्मिक वर्तनाच्या संदर्भातही आहे कारण असे की धार्मिक वर्तन हे सामान्य वर्तनाचाच एक भाग आहे.

मनुष्यप्राणी या पृथ्वीतलावर अवतरल्यापासून आजपर्यंतचा त्याचा विकासक्रम अभ्यासला तर असे आढळून येईल की निसर्गशक्तींशी झगडत स्वतःचे अस्तित्व टिकविण्याच्या प्रयत्नात त्याने त्या निसर्गालाच आपल्या सेवेसाठी राबवून घेण्यात आपल्या बुद्धीच्या साहाय्याने अमाप प्रगति केली असून गुरुत्वाकर्षणाचा छेद करून बाहेरच्या अवकाशात जाण्यातही यश मिळविले आहे. हे सर्व यश अगदी नेत्रदीपक असले तरी मानवप्राणी म्हणून त्याची जी मूळ मानसिक घडण आहे त्यात काहीही फरक पडलेला दिसून येत नाही. म्हणजेच बाह्य परिस्थितीवर त्याची सत्ता कितीही वृद्धिंगत होत असली तरी मनुष्यस्वभाव हा मूळ होता तसाच आजही कायम आहे. बाह्य परिवर्तनाने या स्वभावाच्या आविष्कारात बदल होत असला तरी मूळ स्वभाव बदलताना दिसत नाही. पूर्वी हाताने जेवत असला तर आता काट्याचमच्याने जेवत असेल, खाण्याच्या वस्तू बदलत असल्या तरी खाण्याची वृत्ती वा प्रक्रिया तीच आहे. हे जसे तसेच मनाचे. पूर्वीचा माणूस आपला क्रोध महत्त्वाकांक्षा आश्चर्य इत्यादी मानसिक अवस्था निर्भेळ शारीरिक क्रियेद्वारा व्यक्त करीत असला तर आज निराळ्या तऱ्हेने व्यक्त करीत असेल. परंतु क्रोध, महत्त्वाकांक्षा, आश्चर्य अथवा इतर मानसिक अवस्था त्याच आहेत. यामुळेच मनुष्याचे वैयक्तिक अथवा सामाजिक वर्तनाचा उलगडा करताना अथवा त्याचे नियंत्रण करताना हा मूळ स्वभाव लक्षात घ्यावाच लागतो नाहून त्यात वास्तवता रहाणार नाही. फक्त हवेत मनोरे बांधण्याचेच समाधान आपल्याला प्राप्त





होईल. भौतिक सृष्टीतही हाच नियम दिसतो. उदाहरणार्थ जमिनीवरून वा घाटातून रस्ते बांधताना वाटेत लागणाऱ्या पाण्याचा स्वभाव लक्षात घेऊन व त्याला योग्य तो मार्ग ठेवूनच ते काम करणे इष्ट असते. असे न केल्यास पाणी आपला प्रभाव केव्हाना केव्हा तरी दाखवून रस्ता उध्वस्त केल्याखेरीज रहाणार नाही. तात्पर्य असे की सृष्टीतील जड पदार्थांबाबत कोणताही व्यवहार करताना ज्याप्रमाणे त्याचा मूलभूत स्वभाव (स्वरूप) लक्षात घेऊनच पुढे जावे लागते त्याचप्रमाणे मनुष्याच्या वैय्यक्तिक व सामाजिक वर्तनविषयक व्यवहार करताना त्याचा मूलभूत स्वभाव अथवा मनोधर्म लक्षात घ्यावाच लागतो. याकडे दुर्लक्ष झाल्यास विपरीत परिणाम झाल्याशिवाय रहाणार नाही. आपले साध्य तर हस्तगत होणार नाहीच. उलट ते आपत्तीला निमंत्रणरूपच ठरेल. सामाजिक नियंत्रणाद्वारे या मूलभूत स्वभावाची तीव्रता कमीअधिक करता येईल, त्याला विशिष्ट प्रकारचे वळण लावता येईल अथवा त्याचे काही अंशी दमनही करता येईल. परंतु त्यात संपूर्ण परिवर्तन घडवून आणणे बहुतांशी अशक्यच. असा हा मूलभूत स्वभाव कोणता ?

सामान्य मानवी स्वभावाचे संपूर्ण व काटेकोर वर्णन करणे अतिशय कठीण आहे. ते जवळजवळ अशक्यच आहे. तरीही आपल्या विवेचनास जरूर इतके वर्णन करण्यात फारशी अडचण नाही. ते वर्णन असे : *

(१) प्राणिसृष्टीमध्ये मनुष्य हा कितीही श्रेष्ठ असला तरी अंती तोही प्राणीच असल्याने विकासाच्या दृष्टीने त्याच्याखाली असलेल्या प्राण्यांच्या स्वभावाशी त्याच्या स्वभावाचे अनेक बाबतीत साम्य आहे. निसर्गातील विविध द्रव्ये व शक्तींवर प्रभाव गाजवू शकणाऱ्या त्याच्या बौद्धिक सामर्थ्यामुळे तो प्राप्त परि-

---

* अमेरिकेतील प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञ मॅक्डुगल याने या शतकाच्या सुरवातीला सहजप्रवृत्तींचा (Instincts) सिद्धान्त मांडल्यानंतर गेल्या तीस चाळीस वर्षांत त्यावर अनेकांनी अनेक दृष्टींनी टीका करून वेगवेगळे सिद्धान्त प्रतिपादले. तरीही या लेखात सहजप्रवृत्तींच्या आधारानेच थोडेसे विवेचन केले आहे याचे कारण इतकेच की या नवनवीन सिद्धान्तांमुळे मूळ सिद्धान्तांत मुख्यतः फक्त शाब्दिक फरक पडतो. मनुष्यस्वभावाची मूळ बैठक जी मॅक्डुगलला अभिप्रेत होती तिच्यात विशेष फरक पडत नाही. शिवाय सिद्धान्तांचा बाऊ न करता प्रत्यक्ष अनुभवानुसार जे दिसते त्यावर आधारित असे विवेचन करण्याचा माझा प्रयत्न आहे.

स्थितीत परिवर्तन घडवून आणू शकतो व या परिवर्तनामुळे त्याच्या मूळ स्वभावाची तीव्रता अधिक उणी होऊ शकते इतकेच.

(२) सहजप्रवृत्ती या माणसासहित सर्वच प्राण्यात दिसून येतात. मात्र मनुष्यात त्यांच्यावर विवेक व बुद्धीचा प्रभाव, प्रत्येक व्यक्तीवर होणारे संस्कार व तिचे वयमान यानुसार वाढत जाऊन त्यांची तीव्रता कमी होत जाते. हाच मुद्दा जुन्या परिभाषेत मांडावयाचा तर असे म्हणता येईल की काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर इत्यादी विकार हे मनुष्यस्वभावाचे अविभाज्य घटक असून त्यांच्या कचाटच्यातून मुक्त अशा व्यक्तीचे अस्तित्व फारसे संभवत नाही. विवेक व बुद्धी यांच्याद्वारा हे विकार काही प्रमाणात नियंत्रित मात्र करता येतात. त्यांच्या आविष्काराला योग्य असे वळण काही प्रमाणात लावता येते.

(३) जिजीविषा हा इतर प्राण्यांप्रमाणेच मनुष्यस्वभावाचाही मूलभूत घटक असून जिवंत रहाण्यास जरूर त्या सर्व शारीरिक गरजा पूर्ण करण्यासाठी प्रत्येकजण अहर्निश धडपडत असतो. ही धडपड प्रसंगी इतकी तीव्र स्वरूप धारण करू शकते की तिच्यापुढे सामाजिक वा नैतिक मूल्ये कोलमडून पडतात. भुकेचे शांतवन करण्यासाठी विश्वामित्रासारख्या श्रेष्ठ व्यक्तीने कुत्र्याची तंगडी खाल्याचा प्रसिद्ध प्रसंग हा प्रातिनिधिक प्रसंगच होय.

(४) वंशसातत्य राखण्याची वृत्ती हीही एका अर्थाने मूलभूत प्रेरणा आहे असे म्हणता येईल. मात्र तिचा प्रभाव तुलनात्मक दृष्टचा पाहिल्यास अप्रत्यक्ष व मंद असतो.

(५) आपल्या सर्वच जीवनात प्रत्येक मनुष्य ( व इतर प्राणीही ) स्वतःला केंद्रस्थानी समजून सर्व व्यवहार करतो. मातृत्व व काही उच्च कोटीतील व्यक्ती वगळता या अहंकारप्रवृत्तीचे राज्य सर्वत्र पसरलेले दिसते. जनकल्याणाप्रीत्यर्थ घोषणा व कृती करणाऱ्यांमध्येही अंती अहंकारवृत्तीच कार्यप्रेरक असते असे सूक्ष्म निरीक्षणाच्या अंती आढळून येते. स्वतःला अधिकाधिक स्वास्थ्य, समृद्धी, आराम अगर समाधान प्राप्त व्हावे हीच सर्व मानवी वर्तनाची मुख्य प्रेरणा आहे. येथे 'स्व' हा शब्द समकेंद्री वर्तुळाच्या केंद्रबिंदूसारखा आहे हे मात्र लक्षात घेणे इष्ट होईल. त्या वर्तुळांची कक्षा देश काल परिस्थितीनुरूप व्यक्तिपरत्वे भिन्न भिन्न असते. उदाहरणार्थ मी म्हणजे मी स्वतः, माझे कटुंब, माझी जात, माझा धर्म, माझे राष्ट्र इत्यादी.

(६) कायमची असमाधानी वृत्ती हे पण आपल्या विवेचनाच्या संदर्भात मानवी मनाच्या घडणीचे विशेष लक्षात घेण्याजोगे अंग आहे. प्रतिकूल घटना घडल्या म्हणजे माणूस असमाधानी बनतो यात आश्चर्य नाही. आश्चर्य हे आहे

की अनुकूल ठरणाऱ्या घटनांतूनही त्याला प्राप्त होणारे समाधान अगदी अल्पजीवी असते. ज्या क्षणी ते प्राप्त होते त्याच क्षणी बहुधा त्याची इच्छा वा आकांक्षा विस्तार पावून अन्य अधिक अनुकूल घटनांची अपेक्षा करू लागते व त्यातून असमाधानाचा उद्भव होतो व हे चक्र असेच चालू रहाते. मनुष्यस्वभावच असा दिसतो की त्याला अगदी अनुकूल परिस्थितीतही स्थिर स्वरूपाचे समाधान फारसे मिळूच शकत नाही.

मनुष्याचे मन वा स्वभाव याच्या मूलभूत घडणीची (ढोबळ प्रकारची का होईना) याप्रमाणे माहिती करून घेतल्यावर हा स्वभाव त्याच्या वर्तनात व प्रत्यक्ष व्यवहारात कसा व्यक्त होतो हेही पहाणे इष्ट होईल. मानवेतर प्राणी आपापली वृत्ती मूळ स्वरूपातच व्यक्त करताना दिसतात. मात्र जिजीविषा ही सर्वांत महत्त्वाची प्रवृत्ती असल्याने तिच्याशी सुसंगत अशा प्रकारेच हे घडत असते. उदाहरणार्थ, दुबळ्याला सबळाचा राग आला तरी तो व्यक्त करताना तो प्रथम आपली सुरक्षितता लक्षात घेईल व तिला फारशी हानी न पोचेल अशा प्रकारानेच बहुधा आपला राग व्यक्त करील. मनुष्यप्राण्याच्या वर्तनावर मात्र सामाजिक, आनुभविक वा अन्य नियंत्रणांची पकड पडत जाते. लहान मुलांवर ही पकड नसल्याने किंवा असल्यास ती म्हणावी तशी तीव्र नसल्याने त्यांचे वर्तन खालच्या प्राण्यांप्रमाणेच होत असते. ती जसजशी वयाने मोठी होत जातात तसतशी उपर्युक्त नियंत्रणे प्रभावी होत जातात. वयाबरोबर विकसित होत जाणारी विवेकबुद्धीही आपला प्रभाव गाजवू लागते. मनुष्य व इतर प्राणी यांच्यांतील हा फरक महत्त्वाचा असल्यानेच मानवी समाज व पशूंचा समाज (असा काही असलाच तर) हे परस्पर भिन्न ठरतात. कोणतीही मूलप्रवृत्ती पशूंमध्ये मूळ स्वरूपातच व्यक्त होण्याचा प्रयत्न करते. माणसांमधील प्रवृत्तींच्या आविष्कारात मात्र फरक पडत जातो. उदाहरणार्थ, क्रोधाच्या आहारी गेलेले पशु अथवा लहान मुले एकमेकांवर तावडतोब शारीरिक हल्ला चढविण्यास प्रवृत्त होतात (भीतीमुळेच यात काही फरक पडला तरच). परंतु मोठी माणसे मात्र या थराला सहसा जात नाहीत. ते बहुधा इतर सौम्य मार्गांनी आपला क्रोध व्यक्त करतात. पशुसमाजात लैंगिक वृत्तीच्या आविष्कारावर कोणतेच बंधन दिसून येत नाही. मानवी समाजात मात्र या वृत्तीला समाजहिताला सुसंगत असे वळण लावण्यात येते. मूळ प्रवृत्तींच्या आविष्काराला लागणारे हे वळण सर्वच माणसांमध्ये सारखेच असते असे मात्र नाही. त्याच्या प्रकारांत व परिमाणांत फरक असू शकतो. मात्र सर्वसाधारणपणे ते एकाच प्रकारचे असते असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

मूलभूत प्रेरणांनुरूप होणाऱ्या वर्तनाला नियंत्रणाद्वारे विशिष्ट वळण लावण्याचे हे कार्य कोण करतो असा प्रश्न यानंतर स्वाभाविकपणेच उद्भवतो. त्याचे उत्तर समाजलक्षी मानसशास्त्र असे देते की विविध प्रकारच्या सामाजिक संस्था हे कार्य अखंडपणे अधिक उण्या प्रमाणात करीत असतात. यात कुटुंबापासून शासनापर्यंत व घरगुती संस्कारांपासून शिक्षणापर्यंत अनेक संस्थांचा निर्देश करता येईल. धर्म ही त्यापैकीच एक अत्यंत महत्त्वाची संस्था असून ती व्यक्ती व समाज यांच्या वर्तनाचे विशिष्ट दृष्टीने व विशिष्ट प्रकाराने नियंत्रण करते. धर्म या संज्ञेत कोणकोणत्या घटकांचा समावेश होतो हे स्थलकालसापेक्षेने ठरते. उदाहरणार्थ, प्राचीन भारतात मनुष्याच्या जीवनाचे सर्वांगीण नियंत्रण धार्मिक विधिनिषेध-नियमाद्वारे करण्याचा प्रयत्न झालेला दिसून येतो तर आधुनिक भारतात जीवनातील फक्त काही अंगांचेच नियंत्रण धर्मद्वारे होते. इतर धर्मांच्या बाबतीतही अधिक–उण्या प्रमाणात हीच परिस्थिती आहे. विज्ञानविकासाबरोबर धर्माचे कार्यक्षेत्र संकुचित होत जाते. दैनंदिन वर्तनाच्या अनेक बाबती धर्माच्या कक्षेतून बाहेर पडतात. हे सर्व खरे असले तरीही धर्माचे आपल्या वर्तनावर लक्षात घेण्याइतके नियंत्रण अद्यापीही आहे हे साध्या निरीक्षणाने कोणाच्याही लक्षात येऊ शकेल. धर्म हे शंभर टक्के थोतांड असल्याने मानवी जीवनातून त्याचे संपूर्ण उच्चाटन झाले पाहिजे; नहून मनुष्य सुखी होणार नाही असे पूर्वग्रहविरहित अभ्यासाने प्रामाणिक प्रमाणे मानणारे खरेखुरे विद्वान या विज्ञानयुगातही क्वचितच आढळतात व जे कोणी असतील त्यांची परंपरा टिकवून पुढे चालविणारे तर त्याहून विरळा. लोकांच्या अंधश्रद्धेचा लाभ उठवून त्यांची पिळवणूक करणारी, धर्माच्या नावावर खपणारी, परंतु खऱ्या अर्थाने धर्माचा भाग नसणारी बांडगुळे शस्त्रक्रियेने काढून टाकली पाहिजेत हे म्हणणे निराळे व इंद्राय तक्षकाय स्वाहा या न्यायाने बांडगुळाबरोबर धर्म या संस्थेलाच मूठमाती दिली पाहिजे हे म्हणणे निराळे. या दुसऱ्या मार्गाचे हिरीरीने प्रतिपादन करणारी निदान आपल्याकडील उच्चभ्रू माणसे तरी अधिक जबाबदारीने बोलतील व लिहितील तर या गरीब देशाच्या जनतेवर फार उपकार होतील. सामान्य माणसे परंपराप्रिय असतात. सर्वांगीण विचार करण्याची त्यांची पात्रता नसते, व समाजस्थैर्याच्या दृष्टीने परंपरा ही समाजात फार मोठे कार्य घडवून आणते हे या लोकांनी लक्षात घेतल्यास अशी बेजबाबदार वक्तव्ये करण्यापूर्वी ते दहा वेळा विचार करतील (अनिष्ट परंपरा वा चालीरीती, विशेषतः धर्माच्या नावावर टिकवून धरल्या पाहिजेत असे अर्थात कोणीही म्हणणार नाही.) निधर्मीपणाचा हा अर्थ नाही. धर्माचे उच्चाटण हे त्यात अभिप्रेत नाही. स्वतःच्या राजकीय वा अन्य स्वार्थासाठी कोणीही तसा









अर्थ त्यावर लादू नये. लादल्यास त्याचे समाजजीवनावर अनिष्ट परिणाम होतील हे अशा सर्वांनी नीट लक्षात घेणे अगत्याचे आहे. जगन्मान्यता पावलेले श्रेष्ठ वैज्ञानिकही धर्माच्या प्रभावापासून सर्वस्वी मुक्त असे फारसे आढळून येत नाही. मग सामान्य बहुजन समाजाबद्दल काय बोलावे ? व त्याला दोष कसा लावावा ? अंधश्रद्धेला बळी पडून धर्माच्या कच्छपी लागल्याचा आरोप या सामान्य जनतेच्या बाबतीत करणे सोपे व कदाचित सोयीचेही होऊ शकेल; परंतु बहुसंख्य वैज्ञानिकांबद्दल तर तसे म्हणता येणार नाही ना ? मग ही मंडळी धर्माचे तथाकथित जोखड झुगारून देण्यास का प्रवृत्त होत नाहीत ? व ती होत नसतील तर अर्धवट ज्ञानाच्या हळकुंडाच्या तुकड्याने काहीशी पिवळसर झालेली मंडळी त्या फंदात का व कशी पडतात ? देवदूतही जेथे पदार्पण करण्यास कचरतात तेथे मूर्ख माणसे मात्र बिनदिक्कतपणे घुसण्याचा प्रयत्न करतात ( Fools rush in where angels fear to tread ) अशा अर्थाच्या इंग्रजी वाक्प्रचाराचेच हे एक उदाहरण आहे हे यावरून स्पष्ट होईल.

श्रेष्ठ दर्जाची बुद्धी व कर्तृत्व व्यक्तविणारी अनेक माणसेही धर्माचे अस्तित्व मानतात व धर्मामुळे प्रभावित होतात; यावरून माझ्या मते दोन महत्त्वाच्या गोष्टी सूचित होतात.

१) धर्म व विज्ञान यात सामान्यतः समजला जातो तसा कार्यकारण संबंध नाही. व

२) धर्माचा उगम मानवी मनाच्या घडणीत असून ती घडण जो पावेतो कायम आहे तो पावेतो मानवी जीवनात धर्माला कोणत्या ना कोणत्या स्वरूपात स्थान रहाणारच. या मुद्यांच्या सविस्तर विवरणाकडे आता वळू.

१) धर्म व विज्ञान यांच्यातील परस्परसंबंधाबद्दल फार मोठा गैरसमज असलेला दिसून येतो. सृष्टीमधील प्रत्येक घटनेचे स्पष्टीकरण वैश्विक नियमांच्या आधाराने करण्याचा प्रयत्न वैज्ञानिक करतो हे खरेच आहे व या कामात वाढती प्रगती दिसून येत आहे हेही खरे आहे. परंतु यावरून या चराचर सृष्टीच्या बुडाशी कोणती तरी अगम्य शक्ती असून ती या सर्व घटनांचे सूत्रचालन करते असे म्हणण्यात विरोध वा विसंगती कोठे आहे ? ती शक्ती आपल्या त्या त्या प्रसंगीच्या लहरीनुरूप हे संचालन करते असे प्रतिपादले तर मात्र ते वैज्ञानिकांच्या मूलभूत सिद्धान्ताशी विरोधी होईल. परंतु ती शक्ती

स्वतःच निर्माण केलेल्या नियमांच्या आधाराने हे काम करते असे म्हटले तर हा विरोध ताबडतोब दूर होईल. म्हणून धर्म व विज्ञान यात द्वैत असून ते परस्पर-विरोधी आहेत हे म्हणणे टिकण्यासारखे नाही. विज्ञानामुळे धर्मात शिरलेल्या अंधश्रद्धा व अनिष्ट परंपरारूपी फापटपसारा नष्ट होत असला तरी धर्माच्या गाभ्याला फारसा धक्का लागत नाही, हे आवर्जून लक्षात घेतले पाहिजे. असे न केल्यास सुक्याबरोबर ओलेही नष्ट होऊन आपण परंपरेने चालत आलेल्या एका मोठ्या ठेव्याला मुकू. या ठेव्यावर जळमटे झाली असतील तर ती जरूर नष्ट करावी; परंतु मूळ ठेवा जतन केलाच पाहिजे.

कोणाला असा प्रश्न सहजच पडेल की धर्माचा गाभा व इतर जळमटे अथवा फापटपसारा यात फरक करण्याची कसोटी काय व लावणार कशी ? याचे उत्तर सोपे आहे. आपण या लेखाच्या सुरवातीला पाहिल्याप्रमाणे या धरणीमातेवर ऐहिक जीवन व्यतीत करताना त्यात येणाऱ्या विविध प्रकारच्या अनुभवांमुळे माणसाला सतत असे वाटत असते की आपले जीवन आपणच घडवावयाचे असले तरी त्या कामात आपण शंभर टक्के स्वतःच्या कर्तृत्वावर विसंबून राहू शकत नाही. या बाबतीत आपण बरेचसे परावलंबी व म्हणूनच असहाय्य आहोत. आपल्याशी संबंधित अशा घटनांवर सुद्धा आपला संपूर्ण ताबा नाही. या घटनांचे संचलन करणारी अदृश्य अशी कोणती तरी अन्य शक्ती आहे. ती अनुकूल असेल तर कार्यसिद्धी होईल; नसेल तर होणार नाही.

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।
विविधाश्च पृथक् चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ॥
( भगवद्गीता १८.१४ )

दैव म्हणजे ही शक्ती असा अर्थ केल्यास ही गीतोक्ती अगदी सार्थ आहे. विज्ञानाच्या प्रगतीमुळे अधिकाधिक घटनांचा उलगडा ऐहिक कारणांनीच होत गेला तरीही तो अनेकवेळा त्या घटना घडून गेल्यावर आपल्या लक्षात येतो. शिवाय उलगडा न झालेल्या घटना बाकी राहतातच. याखेरीज ऐहिक कारणे तरी अमक्याच वेळी अस्तित्वात येण्याचे कारण काय असा प्रश्न बाकी राहतोच. उदाहरणार्थ, भूकंप वा वादळे कोणत्या कारणांनी होतात हे आपल्याला वाढत्या प्रमाणावर समजू लागले असले तरीही ती कारणे अम-क्याच वेळेला का उत्पन्न होतात हा प्रश्न राहतोच. कालांतराने विज्ञानाची अधिक प्रगती झाली म्हणजे कदाचित याही प्रश्नांची उत्तरे मिळतील. परंतु त्यावेळी इतर काही नवे प्रश्न उत्पन्न होतील व आपली विवंचना

अनुक्रमणिका

मागील पानावरून पुढे चालूच राहील. याचा एकंदरीने निष्कर्ष असा की विज्ञान कितीही प्रगत झाले तरी सृष्टीतील घटनांमागील अतर्क्य, अगम्य व अदृश्य शक्तींच्या विचारातून आपली मुक्तता होण्याचा संभव थोडाच आहे. हे वैयक्तिक, सामाजिक वा वैश्विक अशा सर्वच घटनांबद्दल सत्य होय. आपण आपल्या जीवनात सतत असे अनुभवीत असतो की आपण ठरवावे एक व प्रत्यक्ष घडते दुसरेच. हे दुसरे आपल्या अपेक्षेपेक्षा कमी अधिक अनुकूल वा प्रतिकूल असते, किंवा अगदी अनपेक्षितही असते. अशा अनुभवांमुळेच आपल्या मनात अगम्य अशा शक्तीचे विचार उत्पन्न होतात व टिकून राहतात. या शक्तीलाच आपण ईश्वर असे नामाभिधान देतो व तिची कृपा संपादन करून त्यायोगे आपले जीवन अधिकाधिक संपन्न, समृद्ध व निर्विघ्न करण्याचा प्रयत्न मोठ्या श्रद्धेने करतो. कृपा संपादनाचे मार्ग व्यक्ती वा व्यक्तिसमूहापरते भिन्न भिन्न असतात व त्यामुळेच धर्माच्या बाबतीत विविधता निर्माण होते. थोड्या खोल विचाराअंती आपल्याला असेही आढळून येईल की कृपा संपादनासाठी कोणते मार्ग अनुसरावे हे व्यक्तीच्या ( अथवा व्यक्तिसमूहाच्या ) प्रकृतीवर व तिला इतरांकडून मिळणाऱ्या मार्गदर्शनावर अवलंबून असते. अघोरी वृत्तीची माणसे अघोरी उपाय योजतात वा सुचवितात म्हणूनच त्या शक्तीला प्रसन्न करण्यासाठी कोणी कोंबडे बळी देतो तर कोणी बकरे. क्वचित कोणी नरबलिही देतो. कोणी स्वतःच्या देहावरच अघोरी उपाय योजतात. सात्विक वृत्तीची माणसे सात्विक स्वरूपाचे उपाय योजतात वा सुचवितात. संकल्पित उपायांनी कार्यसिद्धी झाली नाही तर मार्ग चुकला असे समजून माणसे इतर उपाय शोधू लागतात. या गडबडीत क्वचित असेही घडण्याचा संभव असतो की अघोरी माणसे सात्विक उपायांच्या व सात्विक माणसे अघोरी उपायांच्या नादी लागतात. मात्र या सर्व धडपडीमागे ईश्वरीकृपा संपादनाचाच हेतू मुख्य असतो. या विवेचनाचा निष्कर्ष असा की ईश्वराचे अस्तित्व मानणे व त्याची कृपा संपादन करणे हा धर्माचा मुख्य गाभा असून त्यासाठी उपयोजिलेले उपाय म्हणजे धर्माचा फापटपसारा होय. प्रत्येक उपायाबाबत काही ठराविक चाकोऱ्या उत्पन्न होतात व त्या परंपरेने चालू रहातात. व्यक्ति ज्या समाजात जन्म घेते त्या समाजाने घालून दिलेल्या परंपरा बाहुतांशी उचलते. कालौघात परिस्थितीनुरूप बदल होत जातो व त्यामुळे फापटपसाऱ्यातही फरक पडत जातो. धर्माचा मुख्य गाभा म्हणजे ईश्वर व त्याची कृपा संपादणे हा होय. फापटपसाऱ्यात कितीही, केव्हाही व कसाही बदल झाला तरी धर्माचा हा मुख्य गाभा मात्र कायम राहतो. त्याला सहसा धक्का लागत नाही असे दिसून येते. यामुळे

त्या दिशेने म्हणजे गाभ्याला धक्का देऊन उचकटून टाकण्याच्या दिशेने होणारे प्रयत्न यशस्वी होण्याचा फारसा संभव नाही. निरीश्वरवादी दर्शने पूर्वीची तर आहेतच शिवाय त्यात नवनवीन दर्शनांची भर पडत आहे. अशा स्थितीतही निर्भेळ निरीश्वरवादी किती सापडतील व जे असतील त्यापैकी त्या निरीश्वरवादाला निरपवादपणे आपत्काळीही घट्ट चिकटून किती राहतील याची शंकाच आहे. फापटपसाऱ्यात मात्र सर्व प्रकार संभवतात. अंधश्रद्धा, विकृत विचारांच्या आहारी जाणे इत्यादींना त्यात अनेक वेळा मुक्तद्वार मिळते व नाना प्रकारच्या खुळचट समजुती व वेडगळ उपाय त्यातून जन्म पावतात. म्हणूनच या बाबतीत सर्व प्रकारच्या सुधारणांना मोठे क्षेत्र उपलब्ध असून त्यात विधायक कार्यालाही फार मोठा वाव आहे. हे कार्य विज्ञानाच्या आधारे यशस्वी होण्यासारखे असल्याने विज्ञानामुळे धर्माच्या गाभ्याला विशेष धक्का तर लागत नाहीच; उलट त्याचे स्वरूप अधिकाधिक शुद्ध होत जाते. यामुळेच मला असे निश्चयाने म्हणावयाचे आहे की विज्ञान हे धर्माला मारक नसून एका अर्थाने तारकच व सारकच आहे. म्हणून या दोघात वैर कल्पिणे म्हणजे दोघांच्याही स्वरूप व कार्याविषयी बालिश अज्ञान प्रदर्शित करण्यासारखे होय. अशा प्रयत्नाने सामान्य जनांचा बुद्धिभेद होण्यापलीकडे व त्यांचे मनःस्वास्थ्य हिरावले जाण्यापलीकडे अधिक काहीही साध्य हाती लागत नाही. म्हणूनच समाजहिताची खरीखुरी कळकळ बाळगणाऱ्यांनी भ्रमिष्ट व अवास्तव कल्पनांच्या आहारी जाऊन आपला व इतरांचा कालापव्यय करण्याचे कृपया टाळावे हेच इष्ट होय. कोणता तरी राजकीय वा अन्य स्वार्थ मनात गुप्तपणे ठेवून तो साधण्याच्या हेतूने बाह्यतः मात्र समाजहिताचा देखावा करणाऱ्यांबद्दल मजसारख्या पामराने काय बोलावे ? व काही बोलले गेले तरी त्याचा स्वतःवर परिणाम होऊ देण्याइतकी ही मंडळी लेचीपेची व कच्च्या दिलाची थोडीच असतात ?

धर्म व विज्ञान यातील परस्पर संबंधाचा विचार याप्रमाणे केल्यावर धर्माचे अधिष्ठान मानवी मनाच्या वर उल्लेखिलेल्या मूलभूत घडणीत आहे किंवा कसे याचा विचार पुढील लेखांकात करू.

◈ ◈ ◈

अनुक्रमणिका

ले. भाई माधवराव बागल

# हावर्ड फास्ट याची अमर कलाकृती

हॉवर्ड फास्टची 'स्पार्टाकस' ही कादंबरी वाचल्यानंतर तिच्यामुळे मनावर झालेले परिणाम लिहून काढण्याची इच्छा आवरेना. माझ्या आनंदाचे आणि मिळालेल्या फायद्याचे वाटेकरी कोणीतरी असावेत ही इच्छा तीव्र झाली. ती स्वस्थ बसू देईना म्हणून मी माझं पेन हातात घेतले.

काही पुस्तके अशी असतात की पान उघडून आत शिरले की नदीच्या ओघात सापडल्याप्रमाणे आपणही त्याबरोबर वहात जातो. पावन होतो. आपलेही शुद्धीकरण होते. तो नदीचा प्रवाह सागरात मिळाला म्हणजे तिथे तो शांत होतो, तसे त्या कथानकाला हृदयात कायमचे स्थान मिळते. त्या आठवणी पुसल्या जात नाहीत. आपल्या ज्ञानात भर पडते. मनाचा विकास होतो. जीवन समृद्ध होते. ध्येयाविषयीची तळमळ उत्पन्न होते. अशी पुस्तके आयुष्यावर कायमचा ठसा उठवतात. दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शक ठरतात.

स्पार्टाकस हे अशापैकी एक अमर वाङमय आहे. स्वातंत्र्य, समता आणि न्यायासाठी स्पार्टाकसने केलेले बलिदान जगाला सदैव स्फुर्तिदायक ठरेल.

कथानक हजारो वर्षांपूर्वीचे असले आणि काल सारखा बदलत असला तरी त्यातील आधुनिकता जराही कमी झालेली नाही. पिळणारा आणि पिळला जाणारा असे वर्ग जोपर्यंत अस्तित्वात आहेत तोपर्यंत या पुस्तकाची उपयुक्तता कमी होणार नाही.

आज पिळवणुकीची साधनेच फक्त बदलली आहेत. त्याची मारक शक्ती हजारो पटीने वाढली आहे. पण वृत्ती तीच ! कालची माणसे मेली पण त्याच वृत्तीची नवी माणसे, नवा मुखवटा, नवी साधने जास्ती भयानक जास्ती सफाईची हाती घेऊन संहार करण्यास सज्ज आहेत.

साम्राज्याची राजधानी रोमहून हलली. तिने जागाच तेवढी बदलली. आता तिची मर्यादा वाढली. तिच्या अन्यायाचे व संहाराचे स्वरूप वाढले. कक्षा वाढली.

अनुक्रमणिका






आज ती जगभर अत्याचारी तांडव नृत्य करीत आहे. केवळ स्वतःच्या स्वार्थी महत्त्वाकांक्षेसाठी जगाची राख-रांगोळी चालली आहे.

त्यावेळी गुलामांना जनावराप्रमाणे दावणीला बांधत. पशूहूनही त्यांचा छळ होत असे. जितकी माणूस जनावराची काळजी घेतो तेवढी माणसाची काळजी घेत नसत. ज्यांच्या पिळवणुकीवर रोमन साम्राज्य उभारले त्यांची करमणुकीसाठी हत्या होत असे. त्यांची कातडी सोलली जात – त्यांची शिकार होत होती. जनावरांप्रमाणे त्यांना एकमेकांवर मरेपर्यंत लढायला लावत. वाघाची व त्यांची आखाड्यात लढत लावून नागरिक त्यांच्या मरणाचा खेळ लावून करमणुकी करून घेत. त्यांना जिवंतपणी लाकडी क्रॉसवर छिनून त्या मरणयातना, किंकाळ्या, अन् तडफड रोमन लोक मोठ्या कौतुकाने पहात. त्यात आपण भयंकर असे अस्वाभाविक काही करीत आहोत असे वाटत नसे. त्यांची मरणाची झुंज लावून आपण कुस्त्या किंवा रेस पाहतो त्याप्रमाणे नागरिक नटून थटून तो खेळ पहायला जात. ते हत्येचे सौंदर्य पहायला स्त्री-पुरुषांना कसलीच खंत वाटत नसे. त्याला यात्रेचे स्वरूप येई. त्या लढू घातलेल्या गुलामांचा ( ग्लॅडियेटर्स ) मेंदू डोके फुटून बाहेर आला, त्यांच्या हत्यारानी कोथळा बाहेर पडला, आतडी लोंबू लागली, रक्ताने आखाडा रंगू लागला की प्रेक्षक बेहोश होऊन टाळ्या पिटत ! जसा आपण निकाली कुस्तीचा आग्रह धरतो त्याप्रमाणे त्या आखाड्यात त्या खेळू घातलेल्या गुलामांची – ग्लॅडियेटर्सची – प्रेते पडलीच पाहिजेत. लढत सुटून चालायची नाही. त्यातला कोणी हात आवरला किंवा दोघेही 'पुरे आता' म्हणाले की पंचांनी तेथे ठेवलेल्या शस्त्रधारी सैनिकांनी त्या दोघांनाही तेथे ठार मारले पाहिजे, लढणारे कोंबडे रक्तबंबाळ होऊन थकले की आपण ती झुंज थांबवतो पण गुलामांचे मरण पाहण्याची हौस रोमन लोकांना आवरत नसे. त्याच रोमन साम्राज्याच्या न्यायीपणाची तरफदारी इतिहासात केलेली असते. त्या 'रोमन लॉ' चा अभ्यासही केला जातो. लोकशाहीची सुरवात तेथे झाली म्हणतात. पण ती लोकशाही तेथील वरिष्ठ वर्गापुरतं च मर्यादित होती. गुलामांना मात्र त्या लोकशाहीच्या पायाखाली जिवंत पुरून टाकले होते.

हॉवर्ड फास्टने त्या प्रसंगाची काढलेली शब्दचित्रे वाचू लागले म्हणजे ती वाक्ये व ती पाने नाहीशी होऊन तिथे जिवंत चित्रपट उभा राहतो. वाचताना अंगावर काटा उभा राहतो. हात कापू लागतात, छाती धडधडू लागते. ती पाने रक्ताने भिजून गेली आहेत व आपल्या हाताला रक्त चिकटले

आहे असे वाटू लागते व पुढे ते वर्णन वाचवत नाही ! चालता बोलता जिवंत चित्रपट डोळ्यासमोर उभे करण्याची फास्टची लेखनशैली असामान्य आहे. शब्दांची कसरत नाही; उगाच ओढाताण नाही. आकाशातल्या भराऱ्या नाहीत. कथानकात लेखक स्वतःला विसरून जातो. त्यात एकरूप होतो. वाचकही स्वतःचे अस्तित्व विसरून जातो.

मानवी अत्याचाराचे इतके भयंकर दृश्य अद्याप माझ्या वाचनात आलेले नाही. नाही कसे, तो भयानक चित्रपट पुनः बांगला देशमध्ये याह्याखान रंगवत आहे.

मनुष्य मनुष्याशी इतक्या निर्घृणतेने वागू शकतो यावर भरवसा बसला नसता. पण त्या सत्यकथाच होत्या.

पण साम्राज्याची तृष्णा जेथे ज्या राष्ट्रात वाढली ती राष्ट्रे तोच संहार तसाच करत असलेली आढळतात. कोरियात, व्हिएटनाममध्ये, जर्मन कॉन्सेन्ट्रेशन कँपमध्ये व आज बांगला देशामध्ये त्याची पुनरावृत्ती होत आहे. लोकशाही अमेरिका त्यात सहभागी आहे. जपानवर टाकलेल्या नापाम बाँबने ते दृश्य पुनः जगासमोर ठेवले. याह्याखानाने तर सर्वांनाच लाजेने अन् शरमेने खाली पहायला लावले. त्या यमयातनेचे चित्रपट फास्टने जगासमोर उभे केले आहेत. साम्राज्य असेपर्यंत हे प्रकार चालणारच ! अशा मानवी रक्ताच्या सड्यावरच साम्राज्यांची उभारणी होत असते.

रोमच्या ऐश्वर्याच्या कायद्याचा अभ्यास विद्यार्थ्यांना करावा लागला असेल पण त्यांच्या पापाची दुसरी बाजू इतक्या स्पष्ट रूपात आणि भाषेत कोणी मांडली असेल की नाही कोण जाणे. वरून सुंदर, भव्य अन ऐश्वर्यसंपन्न वैभवाखाली पापाचा खच किती भरलेला असतो; कोण भयंकर प्रकार घडत असतात याची कल्पना या ग्रंथाने थोडी बहुत केली आहे.

स्पार्टाकस

वडवानलात वटवृक्ष सापडावा, त्याची पाने जळून खाक व्हावीत, फांद्या कोलमडून पडाव्यात पण त्या जळत्या खाईत वडाचा बुंधा जळून गेला तरी तसाच ताठ रहावा तशी स्पार्टाकसची ध्येयमूर्ती डोळ्यासमोर उभी राहते. त्या होमकुंडातून बाहेर पडलेली 'स्वातंत्र्य, समता आणि न्याय' याची ज्योत विझत नाही. त्या आगीतून बाहेर पडलेले स्फुलिंग सर्व जगभर आज पेट घेत आहेत. स्पार्टाकस आणि त्याचे साथीदार नाश पावले नाहीत. ते मरून अमर झाले. त्यांची शवती असंख्य पटीने वाढली आहे. जिथे जिथे म्हणून साम्राज्यशाहीचा नाच चालला

अनुक्रमणिका

आहे तिथे तिथे स्पार्टाकस लढत आहे. स्पार्टाकस आणि त्याचे भाई मरू शकत नाहीत. साम्राज्याची राक्षसीण दिसेल तेथे प्रतिकाराची शक्ती उभी रहात आहे.

स्पार्टाकसचा त्यावेळी पराभव झाला खरा पण स्पार्टाकसने रोमन साम्राज्य दुबळे केले. छळातून, अन्यायातून ती शक्ती वाढत आहे. समाजवादी राष्ट्राचा उदय म्हणजे स्पार्टाकसचा पुनर्जन्म होय.

स्पार्टाकसचा पराभव झाला पण त्याचा पराभव करणाऱ्या जनरल क्रॅसचा मद उतरला ! गुलामांच्या बंडाळीला सहजी लीलेने चिरडून टाकू असे त्याला वाटले होते पण स्पार्टाकसच्या साथीदारांनी आणि त्याच्या बायकांनी दगडा-धोंड्यांनी आणि मिळतील त्या साधनांनी, सुसज्ज आणि शिस्तबद्ध सैन्याच्या फलटणी दगडांनी ठेचून काढल्या; हत्यारांनी कापून काढल्या. साम्राज्याला हादरा बसवला. सर्व जगाला थक्क करून सोडले. साम्राज्यसत्तेची धुंदी साफ उतरवली.

ज्या गुलामांना कुत्र्याइतकही मानले जात नव्हते, ज्यांची ससेहोलपट केली. ज्यांच्या जीवनाचा खेळ केला. ज्यांना मनुष्यकोटीतले समजले जात नव्हते त्या स्पार्टाकसच्या त्याच्या मरणानंतर एकाकी पडलेल्या बायकोला जनरल क्रॅसने पकडून आणून तिच्याशी लग्न करण्याची इच्छा प्रकट केली. बूट पुसण्यापलीकडे ज्यांना मान मिळत नव्हता त्या गुलाम स्पार्टाकसच्या स्त्रीला रोमन साम्राज्याच्या सर्वश्रेष्ठ सत्ताधीशाने 'व्हरीनाला' माझी अर्धांगी हो म्हणून विनवणी केली. साम्राज्याच्या सरसेनानीच्या पत्नीपदाचा मान देऊ केला. त्याच्या वंशथोरवीची पूर्वपरंपरा मोडून तो तिच्याशी विवाहबद्ध होण्याला तयार झाला.

पण ! पण व्हरीनाने, मृत स्पार्टाकसच्या इमानी पत्नीने, तिच्या पायाशी लोळण घेत आलेले हे— साम्राज्याचे ऐश्वर्य लाथाडून दिले.

'मी आज दुर्बल आहे. एकाकी आहे. तुझ्या ताब्यात आहे. शक्तीच्या जोरावर तू माझ्या देहाचे काहीही करू शकशील. त्याचा ताबा घेऊ शकशील. पण व्हरीना – गुलाम स्पार्टाकसची ही बायको – स्वखुशीने तुझ्या कधीही आधीन होणार नाही.'

रागाने गुदमरून गेलेल्या क्रॅसला आपला अपमान असह्य झाला. इतक्या थोरपदावर नेत असताना नाही कोण म्हणेल असे त्याला वाटले नव्हते ! इतर कोणी स्त्री असती तर त्याच घटकेस तिला फरशीवर आपटून ठार केली असती. पण क्रॅसला व्हरीनाच्या बाबतीत ते धैर्य झाले नाही. तिला भ्रष्ट करण्याचीही छाती झाली नाही. त्याचा राग त्याला असह्य झाला. त्या आवेशात तो म्हणाला,

'जा जा जा, निघून जा माझ्या समोरून' पण त्याने तिच्यावर जबरी केली नाही. तोच खजील झाला ! तिच्या नैतिक सामर्थ्यापुढे त्याची पाशवी शक्ती दुर्बल ठरली.

नवकोट नारायण क्रॉसने, रोम साम्राज्यातल्या त्या धनाढ्य सत्ताधीशाने आपल्या हस्तकांकरवी व्हरीनाला पळवून आणली होती. तिच्या प्रेमासाठी तो वेडा झाला होता. पैसा ओतून, दागदागिन्यांच्या राशी ओतून, तिला वश करण्याचा प्रयत्न केला. क्रोडो नाणी तिच्या पायावर ओतली.

व्हरीना कबूल झाली नाही. तो म्हणाला,

'व्हरीना जगातील कोणती चीज पाहिजे ती बोल. तुला काय पाहिजे ते सांग. मी आणून देतो पण निदान प्रेमाचं हास्य तरी कर.'

'खरंच ना हे ? मला जे पाहिजे ते देणार' ?

मला दुसरं काही नको. मला माझं स्वातंत्र्य हवं. ! हावर्ड फास्टच्या स्पार्टाकसने केलेले परिणाम लेखणीतून प्रकट करण्याला मी असमर्थ आहे ! असले प्रभावी वाङमय आमच्या साहित्यिकांच्या लेखणीतून कधी बाहेर पडेल काय ?

अमेरिकन साम्राज्याच्या पायाला चिरा पाडणारे हे वाङमय प्रसिद्ध करायला अमेरिकेचा कोणी प्रकाशक पुढे आला नाही.

पण ज्या जनतेसाठी त्याने हे पुस्तक लिहले ते पुस्तक प्रसिद्ध होण्यापूर्वीच ग्राहकांनी त्याची किंमत अगाऊच पाठवून दिली. त्यामुळे हॉवर्ड फास्ट स्वतःच हे पुस्तक प्रसिद्ध करू शकले. फास्ट निव्वळ कथा लिहून स्वस्थ बसले नाहीत. ज्या तत्त्वाचे प्रतिपादन करीत आले त्यासाठी त्यांनी स्वतःचा जीवही धोक्यात घातला ! त्यांच्या लेखणीचे घाव इतके जिव्हारी बसले की त्यामुळे त्याचा खून करण्याचा कट करण्यात आला होता.

हावर्ड फास्टच्या अशाच अंग थरारुन सोडणाऱ्या व लढ्यास प्रवृत्त करणाऱ्या अनेक कादंबऱ्या आहेत. स्पार्टाकस ही त्यातील सर्वात उल्लेखनीय सत्य-कथा होय.



तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

# वैज्ञानिकदृष्टी व भारतीय संस्कृती*

निरीक्षणाने व प्रयोगजन्य अनुभवानेच निसर्गाचे ज्ञान प्राप्त होऊ शकते अशा श्रद्धेतून निर्माण होणारी निसर्गाच्या अन्वेषणाची प्रेरणा म्हणजे वैज्ञानिक दृष्टी होय. वैज्ञानिक दृष्टीला संपूर्ण विचारस्वातंत्र्याचे अधिष्ठान असावे लागते. यूरोपला मध्ययुगीन धर्मसंस्थांचे व अंधश्रद्धेचे भयंकर बंधन होते. त्या बंधनांच्या बाहेर शौर्याने बाहेर पडण्याचा प्रयत्न अंतिम स्वार्थत्याग करून किंवा आत्मबलिदान देऊन विज्ञान संशोधकांना करावा लागला. भारताचा प्राचीन व मध्ययुगीन इतिहास पाहिला, तर त्यात संपूर्ण धर्मस्वातंत्र्य व विचार-स्वातंत्र्य होते. प्राचीन जगात कोठेही नव्हते इतके व्यापक वैचारिक स्वातंत्र्य व विचारप्रसाराचे स्वातंत्र्य भारतातील विचारवंतांना प्राप्त झाले होते; असे गेल्या दीडशे वर्षांतील आधुनिक भारतीय विचारवंतांनी वारंवार सांगितले आहे. असे असता इ. स. ८ व्या शतकापर्यंत भारतात विज्ञानाची वाढ झाली परंतु पुढे ती का थांबली याचे उत्तर आमचे विचारवंत देत नाहीत. याचे उत्तर शोधले पाहिजे. आज शुद्ध विज्ञान आणि अनुप्रयुक्त तंत्रविज्ञान या बाबतीत भारताला पश्चिमी जगाचेच संपूर्ण ऋण घेण्याची पाळी आली आहे. भारत आज शुद्धविज्ञान आणि तंत्रविद्या या बाबतीत केवळ अनुकरणावस्थेतच आहे. भारतात आधुनिक विज्ञान व तंत्रविद्या वेगाने प्रसृत व्हावे याकरिता आटोकाट प्रयत्न सुरू आहेत. परंतु ही अनुकरणाची अवस्था संपून जाग-तिक विज्ञानात व तंत्रविद्यांमध्ये लक्षणीय अशी स्वतःची भर भारत टाका-वयास लागेल व पश्चिमी वैज्ञानिकांच्या बरोबरीचे संशोधनकार्य नव्यानव्या क्षेत्रात करून त्यांच्याबरोबर नेतृत्वात सहभागी होईल, असा काळ जवळ

---

* ‘वैदिक संस्कृतीचा विकास’ या पुस्तकाच्या सुधारून वाढविलेल्या आवृत्तीतील एक परिच्छेद.

अनुक्रमणिका

आहे, असे दिसत नाही. हे संपूर्ण परावलंबित्व नाहीसे कसे होईल याचे उत्तर प्राप्त होण्याकरिता भारतात गेल्या बाराशे वर्षांत वैज्ञानिक प्रगती का थांबली व वैज्ञानिक दृष्टी का कुंठित झाली याची मीमांसा केली पाहिजे. ही मीमांसा करण्याच्या अगोदर भारताने प्राचीन काळी विज्ञानोपासना करून जगाच्या ज्ञानात कशी भर घातली हे प्रथम थोडक्यात पाहू या. याबाबतीत डॉ. प्रफुल्लचंद्र रे, ब्रजेंद्रनाथ सील इत्यादी भारतीय व अन्य पश्चिमी संशोधकांनी प्राचीन भारतीयांच्या वैज्ञानिक प्रगतीचा जो आढावा घेतला आहे त्याचे थोडक्यात सार असे आहे :–

ऋग्वेदापासून ब्राह्मणकालापर्यंत किंवा उपनिषदकालापर्यंत भारतीयांनी गणितज्योतिष (पहा पृ. १९६–२००) सृष्टिरचनाशास्त्र, इंद्रियविज्ञान किंवा शरीरविज्ञान, वैद्यक, भाषाशास्त्र, अंकगणित, त्रिमिती, वनस्पतीविज्ञान, प्राणि-विज्ञान, धातुविद्या यांचा पाया घातला. ऋग्वेदाच्या नासदीय सूक्तात (१०।१२९) म्हटले आहे की ही सृष्टी कशी उत्पन्न झाली हे एक विलक्षण कोडे आहे ते उलगडणे फार कठीण आहे; देवांनाही ते उलगडणे शक्य नाही; कारण देवांचा जन्मच सृष्टीच्या उत्पत्तीबरोबर झाला आहे; सर्व विश्व ज्याच्या दृष्टिपथात अशा अध्यक्षालाही हे कोडे उलगडले आहे की नाही हे कसे सांगता येणार ? हे कोडे उलगडण्याचा प्रयत्न सुरू झाला. ऋग्वेदकाली आकाशातील तेजस्वी गोलांचे दैनंदिन निरीक्षण करून नक्षत्र–चक्र निश्चित केले व २७ नक्षत्रपुंजांचा क्रम ठरविला आणि प्रत्येक पुंजाला पृथक् आश्विनी, भरणी इत्यादी नामे दिली. सूर्य अस्ताला जातो तेव्हा तो पृथ्वीच्या दुसऱ्या बाजूला उदय पावतो याचे ज्ञान वैदिकांना होते हे ऐतरेयब्राह्मणातील (३।४४) एका वचनावरून निश्चित होते. पौर्णिमेस सूर्य व चंद्र यांचे जास्तीत जास्त अंतर असते व अमावास्येस कमीत कमी अंतर असते हेही वेदकालीन भारतीयांना माहीत होते. नक्षत्रचक्रातील सूर्य–चंद्रांच्या गतीचे मोजमाप करून दिवसमान, मासमान व संवत्सरमान यांचे गणितही त्यांनी केले. सूर्यचंद्रांचे नक्षत्रांतून परिभ्रमण व नक्षत्रचक्र यांचे ज्ञान चीन, बॅबिलोन, ग्रीस इत्यादी प्राचीन देशांना होते, त्यांच्यापासून भारतीयांनी ते ज्ञान घेतले असे काही विज्ञानेतिहासज्ञ म्हणतात. परंतु वेदांच्याइतका त्याचा प्राचीन लिखित

पुरावा सापडत नाही. सगळे इतर पुरावे वेदोत्तरकालीन आहेत. पायथॅगोरस
व प्लेटो यांच्यामते गणित किंवा संख्या हे विश्वतत्त्व, विश्वाचे मूळतत्त्व
आहे; विश्वरचना ही निश्चित संख्यांकित आहे; हा सिद्धान्त विज्ञानाचा
मूलभूत सिद्धान्त होय. गणिताशिवाय विज्ञानाला अर्थ नाही. परंतु या
सिद्धांताचाही उगम वेदकालीन सृष्टिशास्त्रात मिळतो. शतपथब्राह्मणात म्हटले
आहे की, एका संवत्सराचे १०,८०० कालविभाग ( मुहूर्त ) पडतात;
ऋग्वेदाच्या ऋचाही १०,८०० आहेत; चयननामक अग्नीची वेदी १०,८००
विटांची बनवावी लागते. म्हणजे ही वेदी संवत्सररूप प्रजापतीचे प्रतीक होय;
ही वेदी विश्वरचनेचेही प्रतीक होय. १०,८०० मुहूर्त ( २ घटिका = १ मुहूर्त )
म्हणजे लहानात लहान सौरसंवत्सर होय. नक्षत्रांच्या अवलोकनावरून
हे ठरविले आहे. वेदकालीन ज्योतिषी व सृष्टिशास्त्रज्ञ यांनी याच संख्येच्या
आधारे ४३,२०,००० ( किंवा ४,३२,००,००,०००) वर्षे म्हणजे विश्वाचे
कल्पमान होय असे ठरविले. हा ब्रह्मदेवाचा दिवस होय; व इतकीच
ब्रह्मदेवाची रात्र होय. ब्रह्मदेवाचा दिवस म्हणजे सृष्टिकाल, ब्रह्मदेवाची रात्र
म्हणजे सृष्टीचा प्रलयकाल होय. भगवद्गीतेत ब्रह्मदेवाचा दिवस म्हणजे
युगसहस्र व रात्रही तितकीच असे म्हटले आहे. तेथे युग म्हणजे चार
युगांचा एक गट असे भाष्यकार म्हणतात. वरील सृष्टीच्या कालमानाचा
प्राचीन ग्रीस व बॉबीलोन येथे ओझरता निर्देश सापडतो. हे संपूर्ण काल-
गणित प्राचीन पुराणांमध्ये व आर्यभटाच्या सिद्धान्तग्रंथामध्ये तपशीलवार
सांगितले आहे. बाबिलोनमध्ये ४,३२,००० वर्षे म्हणजे १ कल्प गृहीत
धरत असत. इ. स. पूर्व ८ व्या शतकापूर्वीचे हे विश्वकालगणनेचे विवरण
भारतीयांपासून जगाला मिळाले.

शरीरविज्ञान किंवा इंद्रियविज्ञान वेदकालीच तयार होऊ लागले. (पहा
पृ. १९०–६ ) इ. स. पूर्व दहाव्या शतकापर्यंत झालेल्या वेदग्रंथांमध्ये म्हटले
आहे की, मानवी देहाचे व्यापार वायुतत्त्वामुळे होतात, वायुतत्त्व हेच देहात
व्यापार करते, त्यासच प्राण ही संज्ञा आहे. वायु हीच विश्वाची प्रेरकशक्ती
होय; असा विचार वेदांमध्ये अनेक ठिकाणी सांगितला आहे. देहातील विविध
क्रिया लक्षात घेऊन प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे प्राणाचे पाच

प्रकार दर्शित केले. त्याचवेळी शरीरातील पित्ताचे कार्य आणि मस्तिष्कातील 'इंद्रयोनि' स्तनाकार मांसपींड (Pituitary gland) याचे कफकार्य ज्ञात झाले होते. वात, पित्त व कफ ही तीन तत्त्वे आधारास धरूनच वेदांच्या अंतिम कालखंडात वैद्यक किंवा आयुर्वेद हे शास्त्र तयार झाले. वात हा सर्व शरीरभर फिरत असतो, फुफ्फुसांच्या योगाने त्याला गती मिळते, असा विचार प्राचीन जगाला माहीत होता. भारतातूनच तो इजिप्त व ग्रीस मध्ये गेला. हिपॉक्रिटसचा ग्रंथ 'वायुविज्ञान' प्रसिद्ध आहे. जवळ जवळ भारतीयांनी सांगितल्याप्रमाणे वातकार्याचे ते विवरण आहे. प्लेटोने Timaeus या पुस्तकात सांगितलेले रोगविज्ञान भारतीय रोगविज्ञानाशी जुळते असे आहे. त्यात वात, कफ व पित्त यांच्यावर आधारलेली उपपत्ती सांगितली आहे. रुग्णपरीक्षेचे ग्रीकांच्या ग्रंथांतील निदान हे भारतीयांच्या वैद्यकाशी समान आहे. ग्रहबाधेची कल्पना भारत, बॅबीलोन व ग्रीस यांमध्ये सारखीच होती. शल्यकर्म वा शस्त्रक्रिया कौशल्यात प्राचीन भारतीयांनी पुष्कळ प्रगती केली होती. सुश्रुतसंहितेत शल्यकर्मास प्राधान्य दिले आहे. आयुर्वेदाने बरेचसे रोग शस्त्रक्रियेवाचून बरे करण्यावर भर दिला आहे. परंतु तसे करणे अशक्य झाले तर शस्त्रक्रिया अवलंबिली जात असे. माणसाचे किंवा इतर प्राण्यांचे निखळलेले हाड बसविणे व हाड मोडले असता सांधणे, अंतर्गळ बरे करणे, युद्धात वा अन्यथा शरीरात घुसलेले पदार्थ बाहेर काढणे, देवीच्या रोगावर सूचिभरण, युद्धात झालेल्या जखमा बऱ्या करणे, अर्बुद (गाठ) फोडून बरी करणे, तुटलेला अवयव सांधणे, विद्रूपता नष्ट करणे, औषधांचा द्रव शरीरात सूचीने भरून रोग बरे करणे इत्यादी गोष्टी शल्यकर्मात अन्तर्भूत होतात. २० शस्त्रे धरून शस्त्रक्रियेच्या १२५ उपकरणांचे विवरण सुश्रुताने केले आहे. आहरण (उपसणे), भेदन (फोडणे), छेदन (कापणे), एषण (शरीरातील रोग शोधणे), लेखन (खरवडणे), सीवन (शिवणे), वेधन (टोचणे) व विस्रवण (निचरा करणे) असे शस्त्रक्रियेचे प्रकार त्याने सांगितले आहेत. डोळे, तोंड, गुद, उदर इत्यादिकांवर शस्त्रक्रिया कशा कराव्या, हे तपशील-वार सांगितले आहे. विद्रूपता नष्ट करण्याच्या शस्त्रक्रियेचे ज्ञान जगाला प्रथम

भारतीय वैद्यकापासून प्राप्त झाले आहे. जखमा बिघडू नयेत व भरून निघाव्यात या करिता आवश्यक अशी औषधीयुक्त घृते व तैले तयार ठेवीत. १० वर्षांपेक्षा जुने असे गाईचे तूप वापरून युद्धात तुटलेला हातही शरीराला जोडून बसवीत व तो नीट बसत असे. हिपॉक्रिटसच्या पूर्वीच हे शास्त्र भारतात विकसित झाले होते. परंतु आधुनिक शस्त्रक्रिया ही त्याच्या अत्यंत पुढे गेलेली आहे यात शंका नाही. अलेक्झांडरच्या स्वारीनंतर सुमारे चारशे वर्षे ग्रीस, रोम यांचा भारताशी सतत संबंध होता. त्या काल-खंडात एकमेकांच्या विद्यांचे काही प्रमाणात आदान प्रदान सुरू होते. या काळातील ज्योतिष, शारीर व वैद्यक या विद्यांवर या आदानप्रदानाचा ठसा उमटलेला दिसतो. भारतातील वैद्यकाचा ग्रीकांना परिचय होण्याचे कारण इराणी साम्राज्य हे होय. या साम्राज्याने भारताचा ग्रीसशी आयातनिर्या-तीचा सांधा जोडला होता.

अंकगणित व बीजगणित यांना शास्त्रीय स्वरूप प्रथम भारतीयांनी दिले. दशांक पद्धती व शून्याची कल्पना ही जगाला मिळालेली भारतीय ऋणे होत. भारत हे अतीप्राचीन संस्कृतीतील विज्ञानाचे एक महत्त्वाचे केंद्र होते. आदान प्रदान कोणीकडून कोणाकडे झाले याबद्दल वाद असला तरी वैज्ञानिक दृष्टीने संशोधन करण्याची कल्पना प्राचीन भारतीयांमध्ये दृढमूल झाली होती याबद्दल वाद नाही. वनस्पतीविज्ञान व प्राणिविज्ञान ही अस्सल मूळची भारतीय होत; कारण मुख्यतः भारतीय वनस्पती व प्राणी यांची परिगणना आयुर्वेदात केली आहे हीच गोष्ट हे सूचित करते.

प्राचीन जगाच्या विज्ञानाचा पाया भारताने घातला हे गृहीत धरले तरी भारतात विज्ञानाची वाढ इ. स. ८ व्या शतकापासून का खुंटली याचे उत्तर शोधणे आवश्यक आहे. विचारस्वातंत्र्य होते व धर्मस्वातंत्र्य होते तरी विज्ञानाची वाढ का होऊ शकली नाही ? याचे उत्तर मानवतावादी दृष्टिकोणातून मिळते. मानवतावादाचे मुख्य ध्येय प्रत्येक मानवाच्या नैसर्गिक योग्यतेचा संपूर्ण विकास करणे हे होय. मानवतावाद ही विज्ञानाची मुख्य प्रेरक शक्ती आहे. मानवतावादी ध्येयाच्या साधनेस सामाजिक व धार्मिक संस्थांची संघटना अनुकूल असावी लागते. त्यात व्यक्तीस कृति-

स्वातंत्र्य प्राप्त होत असले तरच विचारस्वातंत्र्यावरची बंधने नष्ट होतात. निसर्गाचा प्रत्यक्ष विचार निसर्गपदार्थांवर चालणाऱ्या मानवी कृतीतून निर्माण होतो. निसर्गपदार्थांवर घडणारी कृती व वैज्ञानिक विचार ह्या गोष्टी परस्परावलंबी आहेत. कृतिस्वातंत्र्य नष्ट केले ते जातिसंस्थेने. वेदकाळाच्या अंतिम कालखंडात जातिसंस्था निर्माण झाली. बुद्धकालापासून भारतीय जातिसंस्था दृढ होऊ लागली. जातिसंस्था आर्थिकदृष्ट्या समाजातील खालच्या वरच्या भिन्न भिन्न जमातींना उपजीविकेच्या साधनांची निश्चित हमी देत होती, म्हणून ती हजारो वर्षे टिकली. एका जातीतील व्यक्तीला दुसऱ्या जातीतील उद्योग व व्यवसाय करण्यास मनाई केली होती. विशेषतः खालच्या जातीच्या लोकांना वरच्या जातीचे व्यवसाय नाकारले होते. खालच्या जातींचे व्यवसाय हे क्रमाने कमी कमी पवित्र मानले गेले याचा अर्थ असा निघतो की खालच्या जातींचे व्यवसाय म्हणजे शारीरकर्मे होत; त्या शारीरकर्मांना जातिसंस्थेने अपावित्र्य दिले. लोहार, कासार, कुंभार, रंगारी, तेली, शिंपी, विणकर, धनगर, गवंडी, सुतार, मूर्तिकार, चित्रकार, मंदिरकार आणि त्याचप्रमाणे व्याध, कोळी इत्यादी शिकारी जमाती आणि खाटीक, नावाडी इत्यादिकांचे धंदे शूद्रव्यवसाय ठरले. चांभार, ढोर, महार, बुरुड, मांग, भंगी इत्यादिकांचे व्यवसाय अतिशूद्रांचे ठरले. मळ, प्राण्याचे मृतशरीर व रक्त यांच्याशी म्हणजे घाणीशी ह्या अतिशूद्रांच्या व्यवसायांचा संबंध येत असल्यामुळे ते सर्वांत अपवित्र मानले. वर निर्दिष्ट केलेले शूद्रांचे व अतिशूद्रांचे व्यवसाय म्हणजे प्रत्यक्ष नैसर्गिक पदार्थांवरील क्रिया होत. भौतिक विद्या व तंत्र ही निसर्गपदार्थांशी ज्या मानवी क्रियांचा प्रत्यक्ष संबंध येतो त्या क्रियांतून जन्मतात. वरील जीवनोपयुक्त शारीरकर्मांचा महिमा अवमानिला त्यामुळे माणसांच्या कर्मस्वातंत्र्यावर बंधन आपोआप आले. शूद्रांचा व सुसंस्कृत, बौद्धिक जीवन जगणाऱ्या उच्च जातींचा संबंध या बंधनामुळे तुटला; ज्याचा बौद्धिक विचाराशी संबंध तो प्रत्यक्ष नैसर्गिक वस्तूंच्या स्वभावज्ञानापासून वंचित झाला; त्यामुळे त्याच्याही विद्या कुंठित झाल्या. खनिजपदार्थ, वनस्पतिवर्ग, प्राणिवर्ग इत्यादी भौतिक वस्तूंशी ज्या व्यवसायांचा नित्य संबंध तेच अपवित्र व सामाजिक दर्जा खाली

आणणारे व जन्मजात ठरले. त्यामुळे समाजघटक व्यक्तींच्या प्रयोगशीलतेवर जन्मजात बंधने पडली. व्यक्तित्व हे जातिभेदाच्या उंच, अनुल्लंघनीय व अभेद्य तटबंदीच्या कारागृहात बंदिस्त होऊन पडले.

धातुविद्या, प्राणिविद्या, रंगांचे रसायन, वनस्पतीविद्या, स्थापत्य ह्यांचा संबंध लोहार, रंगारी, सुतार, गवंडी, शिकारी, नावाडी इत्यादी व्यवसायांशी असतो. लोहार, सुतार, गवंडी, शिकारी, रंगारी इत्यादी जाती म्हणजे एकंदर शूद्र जाती ह्या वाङ्मयीन विद्यांपासून दूर ठेवल्या त्यामुळे व्यवसाय-विषयक ज्ञानाला पुस्तकीविद्येचा आकार विशेषसा आला नाही. व्यक्तींच्या मस्तकातून पुस्तक निघते व पुस्तक हे संस्कृतीचे मस्तक बनते. एकंदर पुस्तकीविद्या ब्राह्मणांच्याच हातात राहिल्या. त्या शूद्रांच्या हाती कधी गेल्या नाहीत व जाऊ दिल्या नाहीत.

जातिभेदामुळे माणसांचे दूरदूरच्या प्रदेशांशी संबंध केवळ तीर्थयात्रे-मुळे येत असत. एका प्रदेशातून दुसऱ्या प्रदेशात कायम वस्ती करण्यास माणसे कचरत असत. कारण प्रदेशभेद जातिभेदास कारण झाले. त्यामुळे उपजाती बनल्या. एकमेकात मिसळून राहण्याला जातिबंधनामुळे पायबंद पडला; मोकळ्या मनाने एकमेकांचे व्यवसायकौशल्य प्राप्त होण्यास व कौशल्याचा विनिमय होण्यास अडथळे निर्माण झाले.

इ. स. च्या प्रारंभापासूनच परदेशगमन हे सदोष मानू लागले. त्यामुळे देशोदेशी पर्यटनामुळे प्राप्त होणाऱ्या जगाच्या प्रत्यक्ष ज्ञानास भारतीय पारखे होऊ लागले. परदेशातील भिन्न मानवजमाती, त्यांच्या संस्कृती, त्यातील ऋतुमान, वनस्पती, प्राणी, खनिजे यांचे ज्ञान त्यामुळे प्राप्त होऊ शकले नाही. दृष्टी संकुचित झाली. परंपरागत जुन्या विद्यांमध्ये सर्व ज्ञान साठलेले आहे व तेच सत्य आहे अशी भावना दृढ झाली. मूळ ग्रंथांवर भाष्ये, भाष्यांवर टीका, टीकांवर विवरणे व उपटीका यांचाच सुकाळ इ. स. ८ व्या शतकानंतर होऊ लागला. भारताच्या बाहेरील मानवी जग किती मोठे व विविध आहे याची जाणीव राहिली नाही. भारत ही सुवर्णभूमी व पवित्र भूमी, इतर भूमी म्लेंच्छ भूमी व अपवित्र भूमी मानली गेली त्यामुळे

बाहेरचे शत्रू की मित्र याचाही विचार आला नाही. बाहेरून या सुवर्ण भूमीवर अपहार करणाऱ्या जेत्यांच्या जमाती लागोपाठ हल्ला करू लागल्या, लुटू लागल्या, येथे सत्ता स्थापू लागल्या; अशी हजार वर्षे लोटली. जातिभेदामुळे सामाजिक अभिसरण कुंठित झाले; व्यवसायस्वातंत्र्य नष्ट झाले. व्यक्तित्वाच्या विकासाला सामाजिक अभिसरण आवश्यक असते. संस्कृतीच्या व ज्ञानाच्या विकासाला सामाजिक अभिसरणामुळे जीवन मिळते. जातिभेदामुळे समाज हा शिलीभूत ( दगडा सारखा ) झाला.





अनुक्रमणिका








प्रा. न. र. फाटक

श्री

# महाभारत–समीक्षा

## प्रकरण पहिले

## ग्रंथमुख

गुरवे प्राङ्नमस्कृत्य मनोबुद्धिसमाधिभिः ।
संपूज्य च द्विजान्सर्वांस्तथान्यान्विदुषो जनान् ॥ १ ॥
महर्षेः सर्वलोकेषु विश्रुतेषु च धीमतः ।
प्रवक्ष्यामि मतं कृत्स्नं व्यासस्यामिततेजसः ॥ २ ॥

भावार्थ– प्रथम मनोबुद्धीच्या एकाग्रतेने गुरूला वंदन करून तसेच द्विज आणि इतर विद्वानांना पुजून सर्व लोकात प्रसिद्ध असलेले अपार तेजस्वी अशा महर्षी व्यासांचे संपूर्ण विचार सांगतो.

जनमेजयाचे सर्पसत्र चालू असता त्याठिकाणी व्यास मुनी आले. जनमेजयाने त्यांना मागील वृत्तान्त सांगण्याची विनंती केली. व्यासांनी भारत हा ग्रंथ पूर्वीच सिद्ध करून तो आपला शिष्य वैशंपायन याला शिकविला असल्याने गुरुजींनी त्याला ग्रंथविषय सांगण्याविषयी सुचविले व त्याप्रमाणे वैशंपायनाने ग्रंथविवेचनाला प्रारंभ करताना जे मंगलाचरणाचे उद्गार काढले ते येथे दाखल केले आहेत. ते आदिपर्वाच्या पंचावन्नाव्या अध्यायात सुरवातीलाच आलेले आहेत. त्याला अनुसरून प्रस्तुत लेखनाला आरंभ करावयाचा आहे.

या श्लोकावरून असे दिसते की व्यासांइतकीच त्यांच्या ग्रंथाचीही ख्याती सर्वत्र पसरली होती व त्या ख्यातीचे संदर्भ आदिपर्वाच्या दोन अध्यायांत बरेच आहेत. महाभारत हा ग्रंथ आज उपलब्ध असलेल्या स्वरूपात, जेव्हा पूर्ण झाला तेव्हा त्याविषयी लोकात जो अभिप्राय निरनिराळ्या प्रकारे, पण एकाच निश्चित अर्थाचा रूढ होता तो सदर दोन

अनुक्रमणिका

अध्यायांत प्रतिबिंबित झालेला आहे. भारतांचा ( भरतवंशीयांचा किंवा भारतीयांचा ) इतिहास म्हणजे भारत अशा या ग्रंथाच्या नावाची एक उपपत्ती नमूद आहे; परंतु या ग्रंथाचे 'भारत' हे एकच छोटे नाव नसून महाभारत असे दुसरे अन्वर्थक नाव जास्त प्रसिद्ध आहे. यामुळे भारत-महाभारत या दोन नावांचा खुलासा करणे ग्रंथरचनेवर शेवटचा हात फिरविणाराला भाग पडून उपाख्यानाखेरीज जो भाग तो भारत व आख्यान उपाख्यान मिळून 'महाभारत' असे याबद्दल स्पष्टीकरण दृष्टीस पडते. अन्यत्र अशी कथा आहे की, एकदा देवर्षींनी चारी वेद आणि भारत यांची तुलना केली. तुलेच्या ( तराजूच्या ) एका पारड्यात वेद ठेवले व दुसऱ्यात भारताला स्थान दिले. पाहतात तो भारत वेदाहून वजनाने ( भारवत्त्वात ) जड असल्याचा अनुभव आला. नुसते भारवत्त्व ( वजन ) जास्त होते असे नसून गुणांचेही ( गुरुत्व ) महत्त्व भारताच्या ठिकाणी वेदापेक्षा जास्त होते. 'महत्त्वाद्भारवत्त्वाच्च महाभारतमुच्यते' - असा तुलनेचा निर्णय आढळल्यामुळे ( लोक ) ग्रंथाला 'महाभारत' म्हणू लागले. या गुणांची प्रौढी दह्यात लोणी, द्विपाद प्राण्यात ब्राह्मण, डोहात ( खोल तलावात ) समुद्र, चार पायांच्या पशूंत गाय, यांच्या श्रेष्ठत्वासारखे ( ग्रंथसंभारात ) भारताचे श्रेष्ठत्व आहे. भारताचे श्रेष्ठत्व आदिपर्वाच्या अध्याय ५६ मध्ये २७ व्या श्लोकात समुद्र व हिमालय यांच्या दाखल्याने वर्णून हे दोन्ही जसे रत्ननिधी म्हणून विख्यातीने ओळखले जातात 'तथा भारतमुच्यते' – तसाच या ग्रंथाचा महिमा असल्याचे सांगितले आहे. चार वेद आणि उपनिषदे यांचे ज्ञान असून ज्याला या आख्यानाचा ( भारताचा ) बोध नसेल तो 'विचक्षण' नव्हे असा शेरा या ग्रंथाच्या पहिल्या अध्यायात नमूद असून कोकिळाच्या आवाजाची गोडी या उपाख्यानामध्ये आहे. कोकिळाच्या आवाजापुढे बाकीचे सारे आवाज कावळ्याच्या ओरडण्या-प्रमाणे तुच्छ ठरतात; तसाच अनुभव महाभारत व इतर वाङ्मय यांच्या संबंधात येतो. भारत एकदा ऐकले की इतर दुसरे काहीच ऐकावेसे वाटणार नाही, अशी भारताची सर्वोच्च योग्यता भारतकारांनी ठिकठिकाणी दाखविली आहे. भारताची अतिविशाल रचना डोळ्यासमोर येताच त्याच्या भारवत्त्वाबद्दल निराळा पुरावा दाखविल्याखेरीज तो गुण मनाला सहज पटणारा आहे; परंतु त्याचे

श्रेष्ठत्व हे भारवत्त्वावर अवलंबून नाही. वर उल्लेखिलेल्या समुद्राच्या व हिमालयाच्या दृष्टान्ताने आकाराचे प्रचंडत्व सुचवून पुढे ह्या दोन्हीस रत्ननिधी म्हटले आहे व तेच भारताचे खरे 'महत्त्व' आहे व त्याची जाणीव भारतकारांनी करून दिली आहे.

या महाकाव्याची रचना व्यासांनी तीन वर्षे सतत खपून (सदोत्थायी) अशी केली की, त्यातून तत्कालीन भारतीय लोकजीवनाचे कोणतेही अवश्य ते अंगोपांग सुटू नये. धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारी पुरुषार्थांचा उपदेश यात असल्याचे उल्लेख पुष्कळ आहेत. या पुरुषार्थांची नावे अगदी लहान द्व्यक्षरी असली तरी त्यांचा विषय फार मोठा आहे. यात धर्माचे विवेचन आहे, पण हा ग्रंथ मनु-याज्ञवल्क्यांच्या स्मृतीसारखा नाही. यात अर्थाचे निरूपण आहे, परंतु ॲडाम स्मिथच्या ग्रंथासारखा हा निर्भेळ संपत्तिशास्त्राचा ग्रंथ नाही किंवा कौटिल्याच्या राजनीतीसारखाही नाही. काम हा शब्द सामान्यतः स्त्रीपुरुषसंबंधाच्या अनुरोधाने वापरला जातो. पण वात्स्यायनाच्या कामशास्त्राचा विषय भारतामध्ये नाही. यांतील ज्या संवादातून कामाची चर्चा आहे तेथे इच्छा-आकांक्षा या अर्थाने हा शब्द स्वीकारल्याचा प्रत्यय येतो व तो संस्कृत भाषेलाही मान्य आहे. मोक्ष – जन्ममरणाच्या चक्रातून सुटका – हा भारतीयांचा परम पुरुषार्थ. त्याचीही व्यवस्था शांतिपर्वाच्या मोक्षधर्मविभागात याविषयी अनेकांचे संवाद देऊन लावलेली आहे. त्यात जास्तीत जास्त वेदान्त आहे. पण ही व्यवस्था बादरायणाच्या सूत्रासारखी शास्त्रीय नाही. चार पुरुषार्थांचा निर्देश केल्याने भारताच्या अंतरंगाचे स्वरूप स्पष्ट होणार नाही यासाठी हा खुलासा केला.

कै. चिंतामण विनायक वैद्य यांचा 'महाभारत - ए क्रिटिसिझम' हा इंग्रजी भाषेतला ग्रंथ प्रसिद्ध झाल्यावर कै. लो. बाळ गंगाधर टिळक यांनी केसरीत १९०५ साली मार्च ते मे या महिन्यात जे आठ लेख प्रसिद्ध केले, त्यांपैकी तिसऱ्या लेखात महाभारताचा वाङ्मयदृष्ट्या विचार करून जे लक्षण श्लोकरूपाने निश्चित केले आहे, ते पाहिल्यास प्रस्तुत ग्रंथाच्या अंतरंगावर अधिक प्रकाश पडेल. टिळकांनी हे श्लोक मूळ ग्रंथातील ठिकठिकाणचे शब्द एकत्र घेऊन तयार केले. काव्याच्या कोणत्या प्रकारात 'महाभारत' बसेल,

याचा ऊहापोह करून हे साध्या रघु-किरातादि महाकाव्यांपैकी नसून ऋषि-प्रणीत अर्थात् ‘ आर्ष-महाकाव्य ’ आहे असे वैद्यांनी ठरविले. हा ऊहापोह त्यांना इंग्रजीतील ‘ एपिक ’ या नावाच्या महाकाव्यवाचक शब्दासाठी करावा लागला. इंग्रजीत रामायण-महाभारताला ईलियडप्रमाणे एपिक म्हणतात. संस्कृत साहित्य शास्त्रामध्ये महाकाव्याचा विचार आहे, परंतु त्या शास्त्राने रामायणमहाभारताला दृष्टी-आड ठेवल्यामुळे या उपेक्षित काव्याबद्दल वैद्यांना चिकित्सा करावी लागली व त्यांनी ‘ आर्षमहाकाव्य ’ हा नवा शब्द उपयोगात आणिला. हा शब्द नवा किंवा निराधार नाही. महाभारताला महाभारतातच काव्य म्हटले असून क्वचित् ‘ आर्ष ’ या शब्दाची त्याला अनुलक्षून योजना आढळते. टिळकांनी तो पसंत करून त्याच्या लक्षणांचे श्लोक तयार केले.

महत्सु राजवंशेषु जातानां दिव्यकर्मणाम ।
श्रीविभूतिमतां वाऽपि प्राचीनानां महात्मनाम ॥
चरितं कीर्त्यते यत्र पुण्यमेकार्थसंगतम ।
इतिहासप्रधानार्थं शीलचारित्र्यवर्धनम ॥
धीरोदात्तं च गहनं श्राव्यैर्वृत्तैरलंकृतम ।
वाक्यजातिविशेषैश्च रसोत्कर्षप्रपोषकैः ॥
अद्भुतार्थाः कथाः यत्र धर्मकामार्थसंश्रिताः ।
लोकयात्राक्रमश्चापि पावनः प्रतिपाद्यते ॥
विचित्रार्थपदाख्यानं सूक्ष्मार्थन्यायबृंहितम ।
रोमहर्षणकृत्काव्यमनेकसमयान्वितम ।
महाकाव्यवरिष्ठं तन्महार्थं चार्षसंज्ञितम ॥

—टिळकांच्या या वरील खुलाशाचे निवडक अंश सादर केल्यास श्लोकार्थाबद्दल शंका राहणार नाही. “ महाकाव्याचा कर्ता ऋषि म्हटला म्हणजे त्यासंबंधानें एकप्रकारची पूज्यबुद्धि उत्पन्न होते. काव्याच्या नायकासंबंधानेंही असाच प्रकार आहे. काव्याचे नायक केवळ मोठ्या वंशाचे व धीरोदात्त असून त्यांचे चरित्र लोकांत शील व चारित्र्य याचें वर्धन करणारें असलें पाहिजे ... ‘ एपिक ’ काव्यात नैतिक तत्त्व कांहीं नसतें, परंतु महाभारताची तशी स्थिति नाहीं, असें भारताच्या अखेरीस ‘ भारत-सावित्री ’ म्हणून जे चार श्लोक आहेत, त्यांवरून

स्पष्ट होतें, आर्षकाव्य जर देशांतील सामान्य लोकांच्या अंगीं शौर्य, धर्म, अभिमान, उत्साह किंवा सत्यनिष्ठा यांची जागृति करणार नाहीं, तर, त्या काव्याची योग्यता लोक मानतात तितकी कधींही मानली जाणार नाहीं. वरील श्लोकांत 'शीलचारित्र्यवर्धनं' असे पद आहे. तें आमच्या पदरचें नाहीं. तर खुद्द व्यासांनीच आपल्या भारतास 'शीलवर्धन' असें म्हटलेलें आहे व त्यावरूनच तें आम्हीं घेतलेलें आहे.... वरील लक्षणांतील शेवटच्या चार ओळी तर फारच महत्त्वाच्या आहेत ... या चार ओळींत 'लोकयात्राक्रम' 'सूक्ष्मार्थन्याय,' 'अनेकसमयान्वित' आणि 'महार्थ' अशीं जीं पदें आहेत, तीं आम्ही नवीं योजलेलीं नसून व्यासांच्या महाभारतांतीलच आहेत. प्राचीन थोर पुरुषांचे चरित्र ज्यांत वर्णन केलेलें आहे तें काव्य वाचल्यानें वाचकाचें शील व चारित्र्य वाढतें, इतकेंच नव्हे तर काव्यांतील थोर पुरुषांवर जेव्हां अनेक तऱ्हेचे प्रसंग (समय) येतात तेव्हां ते वर्तन कसें करतात हें ऐकून सामान्य लोकांनीं आपला लोकयात्राक्रमही कसा ठेवावा, हें त्यांस कळून येतें. त्याचप्रमाणें कोणतेंही कर्म नीतिदृष्ट्या शुद्ध कीं अशुद्ध याचा निर्णय करण्याची संसारांत जेव्हां वेळ येते तेव्हां निर्णय कसा करावा याचाही अशा प्रकारच्या महाकाव्यापासून राष्ट्रांतील लोकांस बोध होतो. आर्षकाव्य इतिहासप्रधान असावें, केवळ काल्पनिक नको, असें लक्षण करण्याचा हेतूही हाच आहे ... सदर महाकाव्य सूक्ष्मार्थन्यायानें युक्त, संसारांतील अनेक प्रसंगांचे द्योतक, आणि पावन लोकयात्राक्रमाचें प्रतिपादक असावें ... भारतीय युद्ध कीं ज्यांत हिंदुस्थानांतील त्यावेळच्या बहुतेक राजांनीं कोणत्या तरी पक्षास मिळून आपली करामत दाखविली, त्यापेक्षां अधिक महार्थक व काव्योपजीवी विषय दुसरा कोणता असणार? 'अनाश्रित्यैतदाख्यानं कथा भुवि न विद्यते' असें जें सौतीनें या महाकाव्याच्या कथानकाबद्दल म्हटलें आहे तें अगदीं यथार्थ आहे. प्रधानपुरुषांच्या शीलवैचित्र्याबद्दल तर महाभारताचे हात धरणारे दुसरें काव्य क्वचितच सांपडेल. युधिष्ठिर, भीम, अर्जुन, कृष्ण, द्रौपदी, भीष्म, द्रोण यांच्या स्वभावाचीं व गुणांचीं चित्रें इतकीं सुरेख वठलीं आहेत कीं, हीं पात्रें महाभारत वाचणाऱ्या किंवा श्रवण करणारांच्या डोळ्यापुढें मूर्तिमंत उभीं राहतात."
टिळकांच्या या विवरणाने महाभारताच्या रचनेतील गुणांचे वाचकांना यथार्थ

ज्ञान होईल. प्रस्तुत उताऱ्यात फक्त मानवव्यवहाराला महाभारत कसे उपयोगी पडेल, याचे टिळकांनी व्याख्यान केले, परंतु या ग्रंथात विश्वाच्या उत्पत्ति-स्थितिसंहाराचा व्यापक विषय अनेक ठिकाणी– विशेषत: सोपपत्तिक विस्ताराने शांतिपर्वात– खेळविला आहे. सारांश परमार्थोपयोगी जेवढे तत्त्वज्ञान महाभारत-रचनाकाळी लोकात रूढ होते तेवढयाचा संग्रह या ग्रंथात आहे.

या ग्रंथाबद्दल खुद्द ग्रंथातच बजावून ठेवले आहे की, हा इतिहासोत्तम कवींना स्फूर्ती देईल. शरीर जगण्याला जसा आहार हा मुख्य आधार तसाच जगातील सर्व कथांचा आधार हा ग्रंथ आहे. सगळे कवी याच ग्रंथावर उप-जीविका करतात. भारत पूर्णत्वास जाऊन त्याचा लोकात प्रसार झाल्यावर दोन हजार वर्षांपूर्वी त्यावर कोणत्या कवींनी आपल्या प्रतिभेचा चरितार्थ चालविला हे निश्चितपणे सांगता न आले तरी भास व त्यानंतरचे कालिदासादी कवी यांनी भारतकाराच्या 'इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुद्धय: ' या वचनाची यथार्थता निस्संशय पटविली आहे. ती इतकी प्रसिद्ध आहे की त्यासंबंधात जास्त उदाहरणांची वाच्यता करायला नको. कालिदासादिकांप्रमाणे गेल्या शंभर वर्षांच्या ताज्या अर्वाचीन काळातही त्या वचनाला दुजोरा देणारी उदाहरणे आहेत. मुसलमानी राज्यात या ग्रंथाची पर्शियनमध्ये भाषांतरे करण्यात आली. महाभारताच्या प्राचीन अर्वाचीन प्रतिभासंपन्न आश्रितांसारखाच दुसरा एक वर्ग आहे; तो म्हणजे देशीविदेशी संशोधकांचा. त्यांनी महाभारताचे मंथन करून जे मिळवले त्याचा येथे विचार करण्याची आवश्यकता नाही. महाभारत या ग्रंथरचनेचे गूढ संशोधकांनादेखील आकर्षक वाटते, हे त्यांच्या उद्योगाचे तात्पर्य महाभारताच्या थोरवीचे दर्शक असल्याने त्याचा उल्लेख केला. संशोधक असूनही भारताबद्दल डोळस श्रद्धा बाळगणारेही विद्वान् आहेत. देशी भाषा उदयास येऊन त्यास वाङ्मय निर्माण करण्याची शक्ती आल्यावर किती भाषांनी भारताचा अनुवाद केला याचा वृत्तान्त फार मोठा होईल. केवळ मराठी भाषेकडे पाहिल्यास मोरोपंतापर्यंत या भाषेच्या पेहरावाची आठ नऊ उदाहरणे दृष्टीस पडतील व महाभारतामधील श्रीमद्भगवद्गीतेच्या मराठी अवतारांची संख्या तर पेशवाई अखेरपर्यंतच्या काळात विसाइतकी भरते. ज्ञानेश्वर हे या अनुवादपरंपरेचे मूळ पुरुष. त्यांना महाभारताविषयी किती

भक्ती होती हे त्यांच्या पुढील ओव्यावरून ध्यानात येईल. ओव्यांचा उतारा थोडा लांब वाटला तरी तो वाचनीय आहे :-

आतां अवधारा कथा गहन । जे सकळा कौतुकां जन्मस्थान ।
कीं अभिनव उद्यान । विवेकतरूचें ॥
ना तरी सर्व सुखांची आदि । जे प्रमेयमहानिधि ।
नाना नवरससुधाब्धि । परिपूर्ण हे ॥
कीं परमधाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळपीठ ।
शास्त्रजातां वसिष्ठ । अशेषांचें ॥
नातरी सकळधर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार ।
लावण्यरत्न भांडार । शारदेचें ॥
नाना कथारूपे भारती । प्रकटली असे त्रिजगती ।
आविष्करोनि महामती । व्यासाचिये ॥
म्हणोनि हा काव्यां रावो । ग्रंथ गुरुवतीचा ठावो ।
एथूनि रसा झाला आवो । रसाळपणाचा ॥
तेवीचि आइका आणिक एक । एथूनि शब्दश्री सच्छात्रिक ।
आणि महाबोधीं कोवळिक । दुणावली ॥
एथ चातुर्य शहाणे झाले । प्रमेय रुचीस आलें ।
आणि सौभाग्य पोसलें । सुखाचे येथ ॥
माधुर्यीं मधुरता । शृंगारीं सुरेखता ।
रूढपण उचितां । दिसे भले ॥
एथ कळाविद्पण कळा । पुण्यासि प्रतापु आगळा ।
म्हणूनि जनमेजयाचे अवलीळा । दोष हरले ॥
आणि पाहतां नावेक । रंगीं सुरंगतेची आगळीक ।
गुणां सगुणपणाचें बीक । बहुवस येथ ॥
भानुचेनि तेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळलें ।
तैसें व्यासमतीं कवळलें । मिरवे विश्व ॥

अनुक्रमणिका

यानंतर हाच विषय काही मनोहर दृष्टान्तांनी घोळून ज्ञानेश्वर पुन: म्हणतात —

नाना पुरतिये प्रतिष्ठेलागी । सानीव धरूनि आंगीं ।
पुराणें आख्यानरूपें जगीं । भारता आलीं ॥
म्हणऊनि महाभारतीं जें नाहीं । तें नोहेचि लोकीं तिहीं ।
या कारणें म्हणिजे पाही । व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥

काही कवींनी पूर्वी या ग्रंथाला वाखाणले. सांप्रत वाखाणणी करणारे आहेत. हा इतिहास पुढेही सांगितला जाईल, अशा अर्थाचा एक श्लोक भारतामध्ये आलेला असून त्याचाही खरेपणा येथे दिलेल्या माहितीने पटेल. महाभारताने राष्ट्रीय ऐक्याचे बीज पेरले व इंग्रजी राज्यात त्याला जोमदार अंकुर फुटले असे टिळकांनी महाभारताच्या प्रभावाचे निदान केले आहे. टिळकांचे केसरीतील एक सहकारी कै. दत्तात्रय गोपाळ लिमये यांच्या 'भारतीय युद्ध' या पुस्तकाला टिळकांनी मोठी प्रस्तावना लिहून दिली. त्या प्रस्तावनेचा पुढील मजकूर भारताच्या प्रशंसेचा आहे "आज सुमारें दोन अडीच हजार वर्षे हिंदुस्थानच्या सर्व प्रांतांतील कवि, पुराणिक, कीर्तनकार वगैरे, ज्या ग्रंथावर आपली भिस्त ठेवून आपलीं काव्यें, पुराणें, कीर्तनें रसभरित करीत आले, तो ग्रंथ महाभारत होय. उत्तरेस हिमालयापासून तों दक्षिणेस कन्याकुमारीपर्यंत आणि पश्चिमेस सिंधुनदापासून तों पूर्वेस ब्रह्मपुत्रा किंबहुना इरावती नदीपर्यंतही भरत खंडांतील पूर्वीच्या छपन्न देशांत सर्वमान्य होऊन आबालवृद्धांस एकसारखाच सर्वत्र प्रिय झालेला हा असा एकच ग्रंथ आहे. रामायणांतील कथा भारतांतील कथेप्रमाणें हिंदुस्थानांत लोकप्रिय झालेली आहे; परंतु राष्ट्रीय दृष्ट्या रामायणापेक्षांही महाभारताची योग्यता अधिक आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं... भरतभूमींत चोहोंकडे पसरलेल्या हिंदु समाजाचा हा (ग्रंथ) जीवात्माच आहे म्हटलें तरी चालेल.... धर्माच्या बाबतींत सर्वमान्य झालेली श्रीमद्भगवद्गीता ही मूळची महाभारतांतीलच आहे; व बाराव्या शतकाच्या सुमारास धर्मजागृति करण्याचे कामीं तिचेंच भाषांतर कारणीभूत झालेलें आहे. यावरून असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, भारतवर्षांत उन्नत पुरुषार्थाचीं बीजें सदैव कायम ठेवून प्रसंगानुसार सदर बीजांपासून योग्य अंकुर उत्पन्न करण्यास महाभारत

हाच राष्ट्रीय ग्रंथ मूळ संस्कृत भाषेत किंवा प्राकृत भाषांतरद्वारा कारण झालेला आहे."

प्रस्तुत प्रकरणाला ग्रंथमुख असे नाव दिले आहे. तोंडओळख असा त्याचा अर्थ असल्याने त्यासाठी अधिक विस्तार करायला नको. अलीकडच्या दहाबारा वर्षांमध्ये महाभारताच्या अभ्यासाची वेगवेगळ्या दृष्टीने पुस्तके प्रसिद्ध झालेली असून त्यांपैकी काही बुद्धिभेदकारक आहेत. त्यांच्या निमित्ताने कै. डॉ. सुखटनकर– महाभारताचे गाढ व्यासंगी– यांनी 'महाभारताचा अर्थ' या विषयावर मुंबई विद्यापीठामध्ये १९४२ जी व्याख्याने दिली, त्यांतील चौथ्या व्याख्यानाचा शेवटचा परिच्छेद बुद्धिभेदापासून सावध राहण्याला उपयोगी पडेल.

The chaos which modern critics think they see in the Great Epic of India is but a reflex of the state of their mind and not in the work at all, which on the other hand is a mighty pulsating work, clothing in noble language and with pleasing imagery a profound and universal philosophy, a glowing and rhythmic synthesis of life.

भावार्थ– महाभारतांत गोंधळ भरलेला आहे, असे मत असलेल्यांचा विचार केल्यास त्यांच्या बुद्धींत गोंधळ असून ग्रंथात नाही असे दिसून येईल. उलट म्हणावे लागेल की या ग्रंथात प्रचंड स्फूर्ति देण्याचे सामर्थ्य असून उदात्त भाषा, मनोवेधक दृष्टान्तादी शृंगार, गाढ आणि सर्वंकष तत्त्वज्ञान, जीवनाच्या अंगोपांगाचा लयबद्ध समन्वय आहे.



प्रा. गजानन भिडे

# ' यशवंतराव होळकर व जनरल लेक यांच्यातील १८०५ चा तह '

कै. रा. ब. द. ब. पारसनीस यांच्या सातारा येथील खाजगी वस्तुसंग्रहालयातील पटवर्धनांकडील कागदपत्रांच्या रुमालांपैकी एका रुमालात यशवंतराव होळकर व जनरल लेक यांच्यात झालेल्या तहासंबंधी माहिती देणारे पत्र मिळाले आहे. पत्र अप्रकाशित असून, यशवंतराव होळकर व जनरल लेक यांच्यात झालेल्या तहाच्या ज्ञात माहितीशिवाय वेगळी व महत्त्वाची माहिती देण्याच्या दृष्टीने हे पत्र उपयुक्त आहे.

हे पत्र कोणाला पाठविले, कोणी पाठविले व कोठून पाठविले, हे पत्रातील मजकुरात दिलेले नाही. छ. १७ जिल्काद ही तारीख दिली असून, वर्ष दिलेले नाही. तथापि पत्रातील मजकुरावरून यशवंतराव होळकर व जनरल लेक यांच्यात २४ डिसेंबर १८०५ ला झालेल्या तहासंबंधीच माहिती देणारे पत्र आहे, याबद्दल खात्री पटते. पत्रलेखक उत्तरभारतातला नसावा, हे पत्रातील मजकूरच सांगतो. पत्र नक्कल स्वरूपात असून अपूर्ण आहे.

श्री

विज्ञापना ऐसिजे, होळकराकडील वर्तमान छ. १७ जिल्काद पावेतो आले ते कलमबंदी तपसील.

१. जातीने होळकर अमृतसरावर होता, फिरंगीयांची पलटणे सतलजानदीचे काठी होती. पस्तीस हजारांची जमेत इंग्रज स्वार, गाडद, गोरा मिळोन आहेत. कलम

१. लिक फिरंगी याणी संभूनाथाबरोबर होळकरास– सांगून पाठविले की, तुम्ही मैद अहात. लपत लपत फिरता. आमचे समोर एक प्रहरभर उभे ठाकोन लढाई करा. त्यात यश तुम्हाला येवो अथवा आम्हास येवो. हा मजकुर संभूनाथ सीखासमागमे सांगून पाठविला. त्यास होळकरांनी उत्तर केले की, लढाई प्रहरभर लागत नाही. दोन घटकाचे काम आहे. बशर्त त्याणी तोफा लढाईस आणू नयेत. सवार गाडद घेऊन मैदानात बंदुख तरवारेची लढाई घ्यावी. आम्ही मोकाबल्यास हजर असो. याच प्रकारे नाथानी लिकास लिहून पाठविले. त्याणी लिहून पाठविले

अनुक्रमणिका






की, तोफाशिवाय आमची लढाई होत नाही. याचे उत्तर होळकरानी केले की, पळालियाशिवाय आमची लढाई होत नाही. आमचे पळणे हेच यश आहे.     कलम

१. हरनाथसिंग व शाहामहंमदखां हे उभयता पलटणाजवळून तीस कोस होते. त्यास होळकरांनी सूचना केली की, तुम्ही जाऊन शबखून घाला व त्याजवरुन त्याणी काबू पाहून घाण घातला. त्यात आठ हजार मनुष्ये इंग्रज कामास आले. फिरंगी सावध होऊन तोफा डागू लागले. मग उभयता निघोन, दहा कोस जाऊन उतरले.     कलम

१. उभयतांनी येऊन लढाईची शर्थ केली. जातीने होळकर आलीयास आम्ही वाचत नव्हतो, म्हणून लिकानी रणजीतसिंग सरदार यास सांगून पाठविले की, त्याजकडे कोणास पाठवून त्याचे मतलब आणविणे आणि त्याची आमची सुला करुन द्यावा. नाहक लढाईस दुतर्फा माणसे मारवावी, यात अधिक नाही. त्याचे उत्तर सीखांनी पाठविले की, तुमचा जो इतबारी असेल, त्यास आम्हाकडे पाठवून देणे, आम्ही येथून कोणास बरोबर देऊन होळकरांकडे पाठवितो. त्याजवरुन त्याणी आपले तर्फेने मीरसाहेब याजला सीखांकडे पाठविले. सीखांनी रामदयाळ यासमागमे शंभुनाथ यास पत्र लिहून होळकरांसी बोलणे म्हणोन उभयता रवाना केले.     कलम

१. उभयता होळकरांचे लष्करास आले. शंभूनाथ यास बरोबर घेऊन जाऊन भेट घेऊन बोलणे लाविले. तीन दिवस खिलबत होऊन जे मतलब होते त्याची याद हवाला केली. त्या उभयतांनी घेऊन सीखापासी आले. त्याणी समजोन लिकसाहेबाकडे गेले. त्याणी सर्व मजकूर ऐकोन भवति न भवति करुन सीखांचे विचारे ठरविले की जो तहनामा महादजी शिंदे याचे वेळचा त्याप्रमाणे करावे. ते याजवर न ऐकतील तर त्यास समजोन सांगावे.     कलम

१. सीखांनी तहनाम्याची नक्कल होळकराजवळ नेऊन रदबदली करुन सिद्ध केले की, या तहनामेपैकी कबूल करावे. होळकरांनी मान्य करुन बोलले की, याशिवाय आणीक कलमे नवीन त्याचीही याद देतो. तेही त्याणी मान्य केले. त्यास हा तह आम्हीही कबूल करु त्यावरुन याद लिहून दिली येणेप्रमाणे:     कलम

१. वसईचा सहा आणेचा दस्तऐवज श्रीमंताजवळून लिहून घेतला. तो माघार आम्हास देणे.     कलम

१. नवीन मुलूख टिपू वगैरेचा घेतला. तो माघारा द्यावा.     कलम

१ इस्तकबिलपासून नवीन मुलुखाचा जो वसूल घेतला तो माघार द्यावा.

१ लढाईत तोफा वगैरे आमचा सरंजाम जो नेला तो व किल्यातील सरंजाम द्यावा. कलम

१ खुष्कीत जमीयेत आहे ती आपले बंदरास झाडून न्यावी. कोठे काही ठेवू नये. कलम

१ पन्नास करोड रुपये स्वारीखर्च द्यावा. कलम

१ जामीन मातबर द्यावा जे तहात अंतर न पडे. कलम

याप्रमाणे साता कलमांची बोलणी लिकासी केली. त्याणी चार कलमे कबूल केली. इ ॥ पासून नवीन मुलखाचा वसूल, पन्नास करोड स्वारीखर्च व जामीन हे तीन कबूल न केले, तेव्हा सीखांनी रदबदली करून ठरविले की, अकरा करोड रुपये स्वारीखर्च द्यावा व होळकराचे जातीस दोन करोडीचा मुलूख द्यावा. दरऐवज चवथे कलम त्यापैकी वगैरे ठरले. जामीन मिळत नाही. त्यास साहा महिने तुम्ही राहून, करारप्रमाणे अंमलात आणून नंतर तुम्ही जावे. हे लिक साहेबानी मान्य केले. मग रहावे कोठे? आम्हास त्याचे भय. त्यास दिल्ली व अकबराबाद व अल्लीगड ही तिन्ही ठिकाणे आम्हाकडे असावी. याचे कराराप्रमाणे सहा महिनेत आणून देऊ. तदनंतर जाऊ. तोवर इजाराप्रमाणे तीन ठिकाणे ठेवणे. याचा माहेवार दीडलाख रुपयेप्रमाणे देऊ. सहा महिन्यात........चा मुलूख घेतला त्यास सोडून देऊन रसीद आणून देऊ. अकरा करोडपैकी तीन करोड नक्त देतो. बाकी दोन महिनेत फडशा करून देऊ. कलम

१. सीखांनी तहनामा व कलमबंदीची याद ठरवून, होळकरांकडे येऊन, समजावून सांगून कबूल करविली. त्याणीही आपला तहनामामय कलमबंदी लिहून तयार केली, मुलूख कोणता देतात हे विचारून द्यावे नंतर मोहोर करून देईन. सीखांनी फिरंगीयास लिहून पाठविले. लिक साहेबाने उत्तर पाठविले की, कुराजमाहानाबाद अंतर्वेदीतील देतो हे होळकरांनी मान्य केले. मग मोहोर करून सीखांचे हवाली केली. ते फिरंगीयास देऊन, फिरंगीयाची मोहोर करून होळकरास दिल्हि. कलम.

१. शिंदे व होळकर यांचे किल्ले, मुलूख यांच्या सोडचिठ्या फिरंगीयाणी दिल्ह्या व दोन करोडीचा मुलूख नवा अंतर्वेदीतील दिल्हा. त्याच्या सनदा दिल्ह्या. त्याणी ठाणी उभयतांची आपलेले किल्ले मुलखात बसली. पन्नास हजार स्वार मीरखान घेऊन जहानाबादेस गेला. तेथे बारमाहा तो राहणार. कलम.

१. जर्नेल लीकसाहेब मय पलटण दिल्लीस जाणार. होळकर याणी जमीयेत पाणिपत व मथुरा येथे रहावे असे ठरले. कलम

अनुक्रमणिका

१. शिंदे देवगडाहून पाणिपतास होळकरांचे भेटीस जाणार त्याचेही बोलणे आले आहे. कलम.

१. इंग्रेज गेलीयावर दिल्ली शिंद्यांचे हवाली करणार होळकर इ॥ पासून आजपावेतो सीखांचे मुलखांत राहिले मगर त्याच मुलखास उपद्रव दिल्हा नाही. फौजेस महिनेचे महिने वीस रोजा देऊन, तेणेकरुन सीख संतोषाने स्नेहाची वृद्धि केली. फौज फार असून, हुकूम एक म्हणोन यश आले. कलम

१. तीन करोड रुपये होळकरांपासी दाखल जाले, बाकीही करारप्रमाणे येतील. कलम

१. शाहारी फिरंगी याणी तहनामा बार ..... जाहीर केला की, होळकर जेर होऊन सुलहेचा पैगाम करून बहुत अजीजी करू लागला म्हणून आम्हीही कबूल करुन त्यास दोन करोड रुपयेचा मुलूख देऊन पन्नास हजार स्वारांनिशी ठाणी सगळी त्याची त्यास देविली असता तो आमचा तो आमचा चाकरच जाला. त्यास गुदास्त करून दिला व दिल्ली व अकबराबाद व अल्लीगड तिन्ही स्थळात ठाणे आमचे. आमचे जमीयेत सगळी असे म्हणून सांगून घेऊन या उभयतांवर दाव घातले आहेत. कलम

१. मीर अलमाचे सफाईत उभयतां मातुश्री ह्या आहेत. त्यात लहान मातुश्रीचा प्रभव विस्तार आहे. त्यास ऐकणेत आले कीं फिरंगी पाच करोड रुपये मागतो. त्यास जबाब तो काहीच देत नाही. त्यांत संशय बहुत आहेत. त्या लहान मातुश्री यांनी मीरास सांगितले की, तुम्ही याजविसीची काही चिंता न करावी. विप्रास तुम्ही मुनीरन मुलखाचे हाताखाली करुन द्यावे म्हणजे तुम्हास सात करोडांचा बंदोबस्त करुन देतो. बोलले होळकरांची मनोती करुन तुम्हास उत्तर आणुन देईन. याची कफिली मजकडे आहे. तुम्ही काही अंदेशा करु नये. हा सरंजाम होत नाही. हे तुम्ही अगत्य केले पाहिजे. म्हणोन निक्षुन आज्ञा केली आहे. त्यास मीरांनीही अंगिकार केलासा दिसत आहे आज दोन दिवसापासोन मीरआलम आपले घरी जनायांत व रोजचे दुकल आपण ऐकांती बसून आलोचना करीत आहेत व येथे मुख्य उभयता मातुश्रीसहीत एकांत करितात. सारांश आता या रासीत येते. कोणीही ममतेचा व ..... त्याचा मनुष्य राहीला नाही. मगर आहे तर विप्र आहे. हा जे करेल ते होऊ शकेल. यात काही संदेह नाही. याजवरून भासते की, त्यास उभारणी करीतील. बिबेसाहेबांचे लक्ष पूर्वीपासून विप्राकडेस बहुत. त्यास आजपावेतो पुत्रास बहुत करून बोलत आली. परंतु ते काही पुढे घडले नाही आता उभयतांचे विप ...त व खराबीत बहुत नाश पावून या अर्थी सफाहीची बानीकार आपण होऊन मीरावर

अनुक्रमणिका

आपला उपकार स्थापन करोन त्यास आपलेत मिळवून घेअन विप्रास काढावयाचे प्रयत्न केले आहेत. पहावे इतकेवर काम होते की न कळे. येथे तो प्रस्तुत सर्वत्र आपले आपले जागी परेशान आहेत. जुजबीयात व कुलीयात बाद पडले आहेत. अद्याप सफाई पुरती नाही. मामा ...... चे या उभयतांनित्य सवाल जबाब घेऊन मीराकडे येत जात असतात परिणाम लागेल ते खरे. गरज आठपंधरा दिवसात उलजून येत आहे. कलम

१. छ. २७ रोजी शनिवारो दरबार जाहला. मीर आले होते. अवलमीर व मुख्य उभयता मातुश्री दोन घटका पावेतो एकांत केला. नंतर समसेल उमराव असनदौला बरीयाब जालेनंतर मुनी मटराम याची बरीमानी जाली नंतर सर्वत्राचा सलाम जाहला. सर्वेच आज्ञा बाहेर बसावयाची जाहली. बापूरायास मात्र इशारा बसावयाचा जाला. नंतर मीरास पूर्वीच मतलबाखाली दसकत करून दिले होते. काल मुक्तिनार येतही जाली. रामाची रवानगी औरंगाबादची मुक्रर ठरली व दुसरे पुरव्यापासी बावीस इसम आगखी कोणी असतील ते शिवाय मीराचे आज्ञा जाऊ नये असे ठरले. त्याचा तपसील, शायावरत दौला व इस्माल यारजंग व राम अरजबेगी ऐसे मोठे हालसुखेनी बसविलेले वगैरे सर्वत्रास मनाई जाहली. गरज आता मीराची जरब चांगली बसली. मुस्तारीच्या नजरा सर्वत्रांनी दिल्या. दुसरे साहेबजादेवर फिरंगेचे पहारे..... सरतेसमयी ठेविले होते ते अवघेच बरखास्त जहाले व दुसरेच दुकलजीस पेशकारी जहाली."

होळकर व इंग्रज यांच्यात १९०५ मध्ये झालेल्या तहाची माहिती, होळकरांची कैफियत, श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर, ऐतिहासिक लेखसंग्रह, होळकर राज्यकर्ते, न्यू हिस्ट्री ऑफ द मराठाज, हिस्टरी ऑफ मराठाज, पूना रेसिडन्सि कार्सपानडन्स भाग ६ व १६. इत्यादी विविध इंग्रजी व मराठी ग्रंथांत दिलेली आहे. या सर्व ज्ञात तहामधून यशवंतराव होळकर पराभूत होऊ अडचणीत सापडून निदान पराभूत पक्षाच्या भावनेने तह करण्यास तयार झाले असे दिसते. प्रस्तुत पत्रांतून यशवंतराव होळकर विजयी पक्षाच्या भूमिकेतून तहास तयार झाले. त्यांनी तहातील अटी ठरविल्या व इंग्रजानी पराभूत पक्षाच्या भूमिकेतून या तहास मान्यता दिली असे दिसते. पत्रास दिनांक घ. १७ जिल्काद पर्यंतचे होळकरांचे वर्तमान कळविले आहे. त्यात वर्ष दिले नसले तरी ते १२२० फसली (१२१५ हिजरी) असावे. मोडक जंत्रीनुसार १७ जिल्काद १२२० फसली बरोबर ७ फेब्रुवारी १८०६ ही तारीख येते. ज्ञात माहितीप्रमाणे २४ डिसेंबर १८०५ ला हा तह झालेला असेल, तर ७ फेब्रुवारी १८०६ पर्यत त्याबद्दलची बातमी येणे शक्य आहे. तसेच पत्राच्या सुरवातीसच 'यशवंतराव अमृतसरवर व

इंग्रज सतलजानदीचे काठी ’ असे वाक्य आहे. दोघांचीही उपर्युक्त स्थिती ‘ डिसेंबर १९०५ ’ मध्येच होती. त्यामुळे पत्रात वर्णन केलेला तह हा होळकर व इंग्रज यांच्यात झालेला डिसेंबर १९०५ मधीलच महत्त्वाचाच तह होय.

वसईच्या तहानंतर ( १९०२ ) इंग्रजांनी बाजीराव दुसरे, यांची पेशवे-पदी नेमणूक केली. त्यावेळेपासूनच गव्हर्नर-जनरलचा होळकरांशी पत्रव्यवहार होता. शिंदे व भोसले यांनी एकत्र येऊन इंग्रजाविरुद्ध केलेल्या युद्धात होळकर तटस्थ होते. शिंदे व भोसले यांच्याशी झालेल्या बऱ्हाणपूरच्या तहातरहीनं इंग्रज होळकरांशी मैत्रीचे संबंध प्रस्थापित करण्याचा, जोरात प्रयत्न करताना दिसतात. तथापि इंग्रजांच्या एकंदर धोरणांची होळकरांना पूर्णपणे जाणीव असावी. त्याचप्रमाणे आपल्या अधिकाराबद्दलही ते जागरुक असावेत असे वाटते. सेनापती लेकच्या २९ जानेवारी १९०४ च्या पत्राला पाठविलेल्या उत्तरात यशवंतरावांनी, ’ १. राजपूतान्यातील रजवाड्यांकडून चौथाई वसूल करण्याचा पूर्वापारचा हक्क अव्याहत चालावा. २. दुआबात व बुंदेलखंडात जे आमचे परगणे पूर्वीपासूनचे आहेत ते आमच्याकडे असावेत. ३. शिंद्यात व आमच्यात कोणताही भेद मानू नये. ह्या अटी कळविलेल्या आहेत. यावरून यशवंतराव होळकर सहजासहजी इंग्रजाच्या ताब्यात जाण्याची शक्यता वाटत नाही. इंग्रजांना होळकर हे एकच शत्रू राहिल्याने त्यांच्या हालचालीकडे इंग्रजांनी लक्ष ठेवले. होळकरांनी पुष्कर व अजमेर ह्या दोन शहरांची लूट करताच गव्हर्नर जनरल वेलस्लीने सेनापती लेकला १४ एप्रिल १८०४ ला होळकरांविरुद्ध युद्ध करण्यास परवानगी दिली.

१८०४ हे वर्ष इंग्रज व होळकर यांच्यातील युद्धाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. होळकरांना इंग्रजांच्या सैन्याची व तोफखान्याची माहिती होती. त्यामुळे त्यांनी समोरासमोर लढाई न करता इंग्रजांबरोबर गनिमी युद्ध करण्याचे धोरण अवलंबिले. एप्रिल १८०४ मध्ये सैन्यबलाच्या व तोफाखान्याच्या जोरावर होळकरांना शरण आणण्यासाठी इंग्रजांनी मॉन्सन या कर्तबगार सेनाधिकाऱ्याची नियुक्ती केली. एप्रिल १८०४ ते ऑगस्ट १९०४ पर्यंतच्या होळकर व मॉन्सन यांच्यात झालेल्या युद्धात होळकरांच्या पराक्रमाची इंग्रजांना जाणीव झाली. मॉन्सनला होळकरांचा पराभव तर करता आला नाहीच, पण युद्धातून माघार घेताना त्याचे मात्र असंख्य हाल झाले. मॉन्सनच्या पिछेहाटाची बातमी सेनापती लेकला समजताच तो काळजीत पडला. २८ ऑगष्ट १८०४ च्या इंग्रज सैन्याच्या हलाखीची हकीगत कानावर येताच त्याच्या जीवाची जी कालवाकालव झाली, ती दि. २ सप्टेंबरच्या पत्रात त्याने गव्हर्नर जनरलकडे व्यक्त केली आहे. “ या







घटनेने ब्रिटिश लष्करी प्रतिष्ठेचे तोंड काळे झाले आहे. निरनिराळ्या गोऱ्या अंमलदारांनी लिहिलेल्या हकीगती जर खऱ्या असतील, तर मॉन्सनच्या हाताखालील उत्तम व निवडक पथकांच्या कसलेल्या पलटणींचा ह्या काळात नाश झाला असे म्हणणे भाग आहे. या युद्धात खलास झालेल्या उत्कृष्ट वीरांची जागा कशी भरून निघणार हे एक परमेश्वरच जाणे, " अशा प्रकारची काळजी लेकने व्यक्त केली आहे. यावरून या युद्धात इंग्रजांना मोठ्या प्रमाणात मनुष्यहानी व आर्थिक हानी सहन करावी लागली असे दिसते.

यशवंतराव होळकर ८ आक्टोबरच्या सुमारास दिल्लीकडे गेले. तथापि दिल्लीचा ताबा मिळविण्यात त्यांना यश आले नाही. सेनापती लेक दिल्लीच्या संरक्षणासाठी तातडीने निघाला आहे हे समजताच, होळकरांनी यमुना ओलांडून दुआबत प्रवेश केला. पाठोपाठ दुआबात आलेल्या लेकची व होळकरांची फरुक्काबादला चकमक होऊन दोन्ही सैन्याला हानीची झळ पोहोचली. सेनापति मॉन्सनच्या सैन्याचे लचके तोडीत असतानाच होळकरांनी भरतपूरच्या राजाशी मैत्रीचे संबंध प्रस्थापित केले होते. भरतपूरच्या राजाच्या मैत्रीच्या साहाय्यामुळे होळकरांनी दिल्लीकडे जातानाच आपली फार मोठी फौज भरतपूरजवळील डीगच्या डोंगरी किल्ल्यावर ठेवली होती. सेनापती लेकला ही बातमी समजताच त्याने डीगच्या किल्ल्यास वेढा घातला. किल्ल्यातून व किल्ल्याच्या बाहेरून होळकराचे सैन्य इंग्रजांना तोंड देत होतेच, तथापि २५ डिसेंबर १८०४ ला इंग्रजांनी किल्ल्याचा ताबा मिळविला.

होळकरांना भरतपूरच्या राजाने मदत केली म्हणून इंग्रजांनी भरतपूरच्या राजाविरुद्ध युद्ध सुरू केले. जानेवारी ७, ११ व फेब्रुवारी २०, २१, १८०५ ह्या चारवेळा इंग्रजी सैन्याने भरतपूरवर निकराचे हल्ले चढविले. तथापि इंग्रजांना सैन्याच्या बळावर ह्या लढाईत यश मिळविता आले नाही. होळकरांचे सरदार व स्वतः होळकर बाहेरून इंग्रजी सैन्यावर हल्ले करीत होतेच, परंतु भरतपूरच्या राजाने माघार घेऊन इंग्रजांशी तह केला व होळकरांबरोबरचे स्नेहाचे संबंध तोडले.

एप्रिल १८०४ पासून मार्च १८०५ पर्यंत इंग्रज व होळकर यांच्यामधील युद्धाच्या हकीगतीकडे पाहिल्यास इंग्रजांना डीगच्या किल्ल्याशिवाय कोठेही निर्णायक यश मिळालेले दिसत नाही. मॉन्सनच्या पिछेहाटीने झालेले नुकसान कधीही न भरून येण्यासारखे होते. होळकरांना इंग्रजांच्या मानाने पुष्कळच कमी मनुष्यहानी सहन करावी लागली होती. इंग्रजांबरोबरच्या युद्धात थकून न जाता किंवा माघार न घेता होळकरांनी शिंदे, भोसले, पटवर्धन, शीख इत्यादी विविध सत्ताधीशांची मदत मिळविण्याचे प्रयत्न करून सर्व एतद्देशीय सरदारांना या इंग्रजाविरुद्धच्या

युद्धात समाविष्ट करून घेण्याचा प्रयत्न चालविला होता. अफगाण, फरेंच व पोर्तुगीजांचे साह्यही मिळविण्याचा त्यांनी प्रयत्न केलेला दिसतो. शिंदे व भोसले ह्यांनाही बऱ्हाणपूरचा तह नकोसा होता. त्यामुळे शिंद्यांनी होळकरांना मदत करण्याचे ठरवून भरतपूरकडे चाल केली. शिंदे व होळकरांची १८०५ च्या एप्रिलमध्ये चंबळनदीचे काठी सबलगडावर भेट होऊन, त्यांच्यात परस्पर मैत्रीचा तह झाला. तथापि शिंदे व होळकर एकत्र झाल्यावर या युद्धाला वेगळेच स्वरूप येईल या जाणिवेने इंग्रजांनी भेदनीतीचा अवलंब केला. शिंद्यांना गोहद व ग्वाल्हेरचा प्रदेश देऊन, २१ सप्टेंबर १८०५ ला त्यांचेबरोबर मैत्रीचा तह केला. शिंदे व होळकरांची संयुक्त आघाडी फोडण्यात इंग्रजांना यश आले असले, तरी प्रस्तुत पत्रात शिंद्यांसाठीही होळकरांनी तहात कांही अटी घातल्याचे दिसते. त्यावरून शिंदे व होळकर इंग्रजांच्या दृष्टिकोनातून यावेळी वेगळे असले, तरी अंत:स्थ एक होते किंवा काय याबद्दल निश्चित माहिती मिळत नाही.

सबलगडला शिंद्याना सोडून होळकर अजमेरला गेले. तेथे त्यांनी जोधपूरच्या राजाचे साहाय्य मिळविण्याचा प्रयत्न केला, पण ते या प्रयत्नात यशस्वी झाले नाहीत. तेथून शिखांची मदत मिळविण्यासाठी होळकर पंजाबात गेले. २९ नोव्हेंबर १८०५ ला भारमल होळकराला लिहिलेल्या पत्रात यशवंतराव लिहितात, “ पतियाळेकर राजे आदिकरुन शिखांच्या भेटी जाहल्या. मसलतीस अनुकूल. लाहोरवाल्याची संधाने आली व शहाकडीलही (काबूलचा अमीर) पत्रे आली. त्याजला सामील करून घेऊन, पुन्हा माघारे शत्रुच्या मुकाबल्यास जावे या विचारे पतियाळचाहून कूच करून छ. १ रमजानीस ( १३ नोव्हेंबर १८०५ ) सतलज नदी उत्तर तीरास फौजकंपूसहित आलो. तेथून शहाकडील पत्र आले की, अटक नदीचा पूल तयार होऊन दोन तीन दस्ते ( पथके ) पार उतरले. आणखीही उतारा चाललाच आहे. दरोबस्त फौजसुद्धा सत्वरच येऊन पोहचेल. या भावी लिहिल्यावरून नदीतीराहून पुढे अमृतसर लाहोरच्या जिल्ह्यात येऊन पोहचलो. लाहोरवाले राजेश्री रणजीतसिंग आदिकरून दरोबस्त शीख सामील झालेत. इत:पर थोडक्याच दिवसात अवघ्यास एकत्र करून श्रीलक्ष्मीकांताचे कृपे ( ने ) शत्रूचा पराभव करून इंद्रप्रस्थ श्रीमथुरा ह्या जिल्ह्यात येऊन पोहचलो. ” यावरून होळकर शिख, अमीर इत्यादींच्या मदतीने इंग्रजांचा संपूर्ण नाश करण्याचे प्रयत्न करीत होते. होळकरांच्या या हालचालींकडे दुर्लक्ष करणे इंग्रजांना अशक्य होते. त्यांनी तातडीने होळकरांचा पाठलाग करून सतलज नदी ओलांडली.

होळकर व इंग्रजांच्या मे ते नोव्हेंबर १८०५ पर्यंतच्या हालचालीकडे पाहिल्यास १८०४ च्या मानाने कोणतेही मोठे युद्ध या काळात घडलेले दिसत

नाही. छोट्या चकमकीमधून दोन्ही पक्षांना हानी पोहचतच होती. होळकरांच्या धावपळीच्या व गनिमी काव्याच्या युद्धपद्धतीमुळे इंग्रजांना होळकरांशी लढणे अशक्य वाटू लागले होते. "होळकर सापडला की, त्याचक्षणी त्याचा चेंदामेंदा करून टाकीन. पण काय करू, तो कुठे थांबेल तर ना," यशवंतरावांच्या वेगापुढे आपले काही चालत नाही ! अशा प्रकारच्या तक्रारी सेनापती लेक, या पावणेदोन वर्षांच्या काळात अनेकदा करताना दिसतो. प्रस्तुत पत्रातही ही तक्रार लेकने शंभूनाथाबरोबर होळकरांना कळविलेली आहे.

इंग्रजांना टिपूबरोबर झालेल्या युद्धात, भोसले व शिंदे यांच्याबरोबरच्या युद्धात व होळकरांबरोबर चालू असलेल्या युद्धात बेसुमार खर्च आला होता. या काळात ईस्ट इंडिया कंपनीला जवळ जवळ चार कोट रुपये कर्ज झाले होते. लढाईच्या धामधुमीने बराचसा प्रदेश उध्वस्त होऊन उत्पन्न घटू लागले. व्यापाराला ओहोटी लागली. थोडक्यात इंग्रजांच्या आर्थिक अडचणी दिवसेंदिवस वाढत चालल्या होत्या. मॉन्सनचा पराभव व ईस्ट इंडिया कंपनीची आर्थिक स्थिती याबद्दलची माहिती इंग्लंडला कळताच, गव्हर्नर–जनरल वेलस्लीच्या धोरणावर टीका करण्यात येऊन, त्याला परत बोलाविण्यात आले. त्यानंतर आलेल्या कॉर्नवालीस व बार्लो ह्या गव्हर्नर–जनरलांना युद्ध ताबडतोब बंद करून, खर्चात तातडीत कपात करण्याच्या सूचना देण्यात आल्या. होळकरांना वेळीच आवरले नाही तर भारतातील लहान मोठे सर्व राजे इंग्रजाविरुद्ध उठतील व पुन्हा सारा हिंदुस्थान जिंकण्याचा खटाटोप करावा लागेल, ही भीतीही तत्कालीन इंग्रजांच्या परस्परांच्या पत्रव्यवहारातून व्यक्त होते. त्यामुळेच १८०५ च्या जानेवारीपासूनच इंग्रज आपले वकील पाठवून किंवा मध्यस्तीच्या साह्याने होळकरांशी तह करण्याचा प्रयत्न करताना दिसतात.

होळकरांना मात्र डीगशिवाय कोठेही पराभव सहन करावा लागला नव्हता. पंजाबात येऊन त्यांनी शिखांची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला व ते प्रयत्न यशस्वी होण्याची चिन्हेही दिसू लागली होती.

प्रस्तुत पत्रात होळकर आपल्या सैन्याला महिन्याच्या महिना पगार देत असल्याची माहिती आहे. यावरून आर्थिक दृष्ट्या किंवा लष्करी दृष्ट्या कमकुवत होऊन तहाच्या साह्याने युद्ध बंद करण्याची आवश्यकता होळकरांना नव्हती

होळकर पंजाबात गेले असे समजताच, इंग्रजांनी रणजितसिंगाबरोबर मैत्रीचे संबंध प्रस्थापित करण्याचे दृष्टीने प्रयत्न सुरू केले. १८०५ पर्यंत रणजितसिंग थोर पदास पोहचलेला नसल्याने त्याला पतियाळा झिंद वगैरे ठिकाणच्या राजांची मदत घेणे आवश्यक होते. उपर्युक्त राजे इंग्रजांकडे झुकत असल्याने, रणजितसिंगाने

मराठ्यांना साहाय्याचे खंबीर आश्वासन दिले नाही. जनरल लेक सतलज नदीचे काठी आल्यानंतर रणजितसिंगाने त्याची भेट घेतली व त्यांच्यात मैत्रीचा तह झाल्याची माहिती बऱ्याच कागदपत्रांतून मिळते. तथापि होळकरांनाही त्याने प्रत्यक्ष विरोध केलेला दिसत नाही. उलट इंग्रज व होळकर यांच्यात प्रत्यक्ष तह घडवून आणण्याचे दृष्टीने त्याने मध्यस्ताची भूमिका पार पाडलेली दिसते.

या पत्रानुसार होळकर पंजाबात असताना त्यांच्या सल्यानुसार हरनाथसिंग व शाहा महंमदखां या त्यांच्या सरदारांनी इंग्रजावर केलेल्या रात्रीच्या हल्यात आठ हजार इंग्रजांची कत्तल झाली.

या प्रसंगाने घाबरून जाऊन जनरल लेकने रणजितसिंगाला तह घडवून आणण्याबद्दल आग्रह केला. या तहाच्या अटी यशवंतराव होळकरांनी ठरविल्या व इंग्रजानी जवळ जवळ सर्व अटी मान्य केलेल्या दिसतात.

प्रस्तुत पत्रानुसार बऱ्याच घटना व व्यक्ती प्रथम प्रकाशात येत आहेत :

१. शंभूनाथ, रामदयाळ व मीरसाहेब, ह्या व्यक्ती येथे प्रथमच उजेडात येत असाव्यात. बहुधा होळकर व इंग्रज यांच्यात तह घडवून आणण्यासाठी प्रयत्न करणारे शंभूनाथ व रामदयाळ हे रणजितसिंगाचे अधिकारी असावे. मीरसाहेब हा इंग्रज अधिकारी आहे.

२. होळकरांनी इंग्रजाविरुद्ध लढाईत गमिनी युद्धपद्धतीचा अवलंब केला व या प्रकाराने युद्ध करणे हेच आमचे यश होय हे होळकरानी स्वतः सांगितले आहे. त्याचप्रमाणे इंग्रजांविरुद्ध समोरासमोर लढण्याचा त्यांचा विश्वासही येथे दिसून येतो.

३. हरनाथसिंग व शाहामहंमदखां ह्यांनी इंग्रजांच्या सैन्यावर रात्रीचा घातलेला हल्ला व त्यात आठ हजार इंग्रजांचा मृत्यू. ही माहिती येथे प्रथमच उजेडात येत आहे.

४. उपर्युक्त हल्याने घाबरून जनरल लेकने रणजितसिंगाना तह घडवून आणण्याबद्दल विनंती केली व या तहाच्या अटी होळकरांनी ठरविल्या आहेत. जवळजवळ या सर्व अटी पराभूत पक्षाच्या भूमिकेने इंग्रजांनी मान्य केल्या आहेत.

५. होळकरांनी सुचविलेली सात कलमे पूर्णपणे नवीन असून येथेच प्रथम प्रकाशात येत आहेत.

(१) वसईच्या तहानुसार ( १८०२ ) चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा अधिकार इंग्रजांनी मिळविला होता. या पत्रात तो परत पेशव्यांसाठी मिळविलेला दिसतो. इंग्रज होळकरांशी तह करण्यासंबंधी जानेवारीपासून प्रयत्न करताना दिसतात. ऑगस्ट १८०५ नंतर या तहाने पुष्कळच मूर्त स्वरूप धारण

केलेले दिसते. पेशव्यांना २६ ऑगस्ट १८०५ ला पाठविलेल्या पत्रात होळकर लिहितात, "शत्रूने आपली हद्द सोडून सरकार अमलात येऊन दंगा केला, यास श्रीमंताचे प्रतापेकरून शत्रूचे पारपत्य केले. त्यावरून तह करण्याविसी शत्रूकडील वकील येऊन बोलत आहे. त्यास सरकारातून काही एक मजकूर शत्रूसी बंदोबस्ताचा बोलायची आज्ञा आल्यास पत्री तपसीलवार आज्ञा यावी. तर पुढे जसा प्रसंग दृष्टि पडेल, त्याप्रमाणे सरकारआज्ञेप्रमाणे करू." यावरून होळकर पेशव्यांना तहात काही अटी घालावयाच्या आहेत काय ? यासंबंधी विचारणा करताना दिसतात. वसईचा तह केल्यानंतर पेशव्यांना आपली चूक समजून आली व या तहातून बाहेर पडण्यासाठी ते प्रयत्न करीत असल्याचा उल्लेखही बऱ्याच कागदपत्रातून मिळतो. शिन्दे व भोसले यांच्या इंग्रजाबरोबरच्या युद्धातही शिंद्यांच्या मदतीला पेशव्यांचे सैन्य असल्याचा उल्लेख ग्रँटडफने केला आहे. या सर्व घटना पाहता वसईच्या तहाने गेलेले चौथाई व सरदेशमुखीचे अधिकार परत मिळविण्याचे कलम पेशव्यांच्या सूचनेवरून किंवा पेशव्यांसाठी या तहात घालण्यात आले असावे.

(२) १७९९ मध्ये टिपूबरोबर झालेल्या युद्धात, तसेच शिंदे व भोसले यांच्याबरोबर झालेल्या युद्धात, इंग्रजानी मिळविलेला सर्व प्रदेश परत करावा.

(३) लढाईत इंग्रजांना मिळालेल्या तोफा व किल्यातील सरंजाम होळकरांना परत करावा.

(४) इंग्रजांनी आपले सर्व सैन्य माघारे बंदरास घेऊन जावे.

(५) स्वारीखर्च म्हणून अकरा करोड रुपये द्यावे. यापैकी तीन करोड रुपये इंग्रजांनी लगेच परत दिले असून उरलेले पैसे दोन महिन्यात देण्याचे कबूल केले आहे.

(६) नवीन मुलखाचा इंग्रजांनी जो वसूल घेतला आहे. त्याबद्दल होळकरांच्या जातीस (बहुदा भीमाबाई या होळकरांच्या मुलीस) दोन करोडचा मुलूख द्यावा. त्याप्रमाणे अंतर्वेदीतील कुराजसाहानाबादचा मुलूख देण्यात आलेला दिसतो. त्या मुलुखाच्या व्यवस्थेसाठी होळकरांनी मीरखानाची नेमणूक केल्याचे या पत्रात सांगितले आहे.

(७) तहातील कलमांच्या अंमलबजावणीसाठी जामीन मिळत नाही म्हणून, लेकने स्वतः दिल्ली, अकबराबाद व अल्लीगड येथे सहा महिने राहून तहातील अटींची पूर्तता करून द्यावी. प्रस्तुत ठिकाणी राहण्याबद्दल दीडलाख रुपये दरमहा द्यावे. सहामहिन्यानंतर लेकने दिल्ली शिंद्याचे ताब्यात द्यावी.

६. होळकरांनी शिखांच्या मुलखात असताना, सैन्याला दरमहा पगार देऊन, आवश्यक त्या वस्तू खरेदी करून घेण्याची ताकीद दिली. त्यामुळे होळकरांनी पंजाबात लूटमार केल्याची इंग्रजी कागदपत्रातील वर्णने वस्तुस्थिती निदर्शक नसावीत असे वाटते. प्रस्तुत पत्रलेखक होळकरांच्या या वर्तनाने त्यांची व शिखांची मैत्री वृद्धिंगत झाल्याचेही लिहीत आहे.

७. होळकर यानी जमीयेत पाणिपत व मथुरा येथे राहावे असे ठरले असल्याचे पत्रलेखक लिहितो "त्यांनी ( होळकरांनी ) आपला तहनामा दुरुस्त होताच पटियाले व खटल वगैरे तालुके सरकार व जयपूरचे राजे डावे हाताकडे टाकून दरकूच आपले तालुक्यात जावे" अशी इंग्रजांनी होळकरांना अट घातली असल्याची, इतर प्रसिद्ध तहामध्ये सापडणारी माहिती वस्तुस्थिती-निदर्शक वाटत नाही.

८. आर्थिक अडचणींना व प्रचंड मनुष्यहानीला कंटाळून इंग्रजांनी होळकरांशी पराभूत पक्षाच्या भूमिकेने तह केला. तथापि त्यांनी ज्या पद्धतीने हा तहनामा जाहीर केल्याचे वर्णन आहे, ते भारतातील इंग्रजांच्या कुटिल नीतीचे द्योतक आहे. अशाप्रकारे तहनामा जाहीर केल्याने, इंग्रजांनी स्वतःचा पराभव तर अंधारात ठेवलाच पण इतर अंकित राज्यांवर दाब ठेवण्यासाठी या तहाचा उपयोग करून घेण्याचा इंग्रजांचा हेतूही सफल झाला. इंग्रजी ग्रंथामधूनही या जाहीर केलेल्या तहाचीच री ओढलेली दिसते. त्यामुळे प्रत्यक्ष विजय मिळविलेल्या होळकरांना अंधारात व अपयशाच्या धुक्यातच रहावे लागले. पत्रलेखकानी इंग्रजांनी हा तहनामा कसा जाहीर केला हे सांगितल्यानंतर वापरलेले," असे सांगून घेऊन या उभयतांवर दाब आणले आहेत." वाक्य इंग्रजाच्या उपर्युक्त कुटिलनीतीची माहिती देण्याच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे.

थोडक्यात १८०४ ते १८०५ च्या इंग्रज–होळकर युद्धात होळकर आर्थिक व लष्करी दृष्ट्या स्वयंपूर्ण असलेले दिसतात. इतर सत्ताधिशांकडून मदत मिळवून गनिमी युद्धपद्धतीचा वापर करून इंग्रजांचा पूर्णपणे नाश करण्याचा त्यांचा विचार नोव्हेंबर १८०५ पर्यंत कायम दिसतो. त्यामुळे होळकर पराभूत होऊन किंवा त्या भावनेनेही तहाला तयार होणे अशक्य वाटते. याउलट इंग्रजांना या युद्धात मोठ्या प्रमाणात मनुष्यहानी सहन करावी लागली. त्यांच्या त्यावेळच्या डगमगत्या आर्थिक स्थितीबद्दल माहिती देणारी पुष्कळशी पत्रे उपलब्ध आहेत. तसेच होळकरांबरोबर इतर सत्ताधीश एकत्र येऊन इंग्रजांविरुद्ध संयुक्त आघाडी स्थापन केली, तर भारतातील आपले अस्तित्व टिकविणे किती अवघड आहे या

कल्पनेने इंग्रजांनी कशाही रीतीने होळकरांशी तह करण्याचे धोरण स्वीकारले व त्यांनी घातलेल्या जवळजवळ सर्व अटी मान्य केल्या असाव्यात असे दिसते. या पत्रानुसार त्या अटींपैकी काही अटी इंग्रजांनी लगेच पूर्ण केल्याचेही सांगितले आहे.

हे पत्र नक्कल स्वरूपात असले तरी, अशा प्रकारची तहांची माहिती देणारी काही पत्रे पेशवे दप्तरातही नक्कल स्वरुपातच आहेत असे प्रा. ग. ह. खरे यांनी, उपर्युक्त पेपर भारत इतिहास संशोधक मंडळात वाचला असताना, सांगितले आहे. मा. रा. ब. पारसनिसांनी या पत्राची मूळ प्रत मालकाकडे परत करण्यासाठी, नक्कल स्वरुपात पत्र लिहून घेतले असावे; अगर मूळ मालकाकडून त्यांना हे पत्र नक्कल स्वरुपातच मिळाले असावे.

१८०५ नंतर इंग्रजांनी भारतीय सत्ताधीशांच्या बाबतीत स्वीकारलेले धोरण तसेच इंग्रजांच्या डळमळत्या आर्थिक परिस्थितीसंबंधाने इंग्रजी कागदपत्रांमधून मिळणारी माहिती व दोन वर्षांच्या होळकर इंग्रजांच्या युद्धाचा आढावा घेतल्यास या पत्रातील माहिती पुष्कळच बरोबर असावी, वस्तुस्थितिनिदर्शक असावी असे वाटते.

पत्राच्या शेवटी हैदराबादच्या निजामशाहीत, मीरआलम व महिपतराव यांच्यात दिवाणी मिळविण्यावरून झालेल्या स्पर्धेनंतर, मीरआलमने आपल्या मार्गातील सर्व अडथळे कशाप्रकारे दूर केले व तो पूर्णाधिकारी कसा बनला याबद्दल माहिती दिली आहे.

संदर्भ : १) होळकरांची कैफियत, संपा. य. न. केळकर २) श्रीमन्महाराज यशवंतराव होळकर ले. न. र. फाटक ३) ऐतिहासिक लेखसंग्रह भाग १५, खरे. ४) होळकर राज्यकर्ते, ठाकूर, वा. वा. 5) New History of the Marathas Vol. III, Sardesai, G. S. 6) A Memoir of central India, Malcolm 7) History of Mahratas, Duff 8) Poona Residency correspondence Vol. VI & XIV. 9) Wellesly's papers.



